# स्वरमेलकलानिधिः

## रामामात्यविरचितः

---

स च

भारद्वाजशर्मणा

यथामति परिशोधितः

---

श्रीगणेशयंत्रालये मुद्रयित्वा प्रकाशं नीतः

---

सन १९१०



ॐ

## ॥ श्रीगणेशायनमः ॥

# स्वरमेलकलानिधि र्विलिख्यते.

रामामात्यप्रणीतेऽस्मिन् स्वरमेलकलानिधौ ।
उपोद्घातप्रकरणं स्वरप्रकरणं ततः ॥
वीणाप्रकरणं चातो मेलप्रकरणं परम् ।
रागप्रकरणं चेति पंच प्रकरणानि हि ॥
उपोद्घातप्रकरणानंतरं राममंत्रिणा ।
तत्र स्वरप्रकरणे द्वितीये प्रतिपाद्यंते ॥
गीतप्रशंसा गंधर्वगानभेदा स्ततःपरम् ।
स्थानानि श्रुतयः शुद्धाः स्वराश्च विकृता अपि ॥

**भावार्थः**—या रामामात्य पंडितानें लिहिलेल्या स्वरमेलकलानिधींत
च प्रकरणें आहेत. १ लें उपोद्घात प्रकरण २ रें स्वर प्रकरण ३ रें
णाप्रकरण ४ थें मेलप्रकरण ५ वें रागप्रकरण. उपोद्घात प्रकरणानंतर
गान्या स्वरप्रकरणांत रामामात्यानें गीतप्रशंसा, गंधर्व व गान भेद,
ानें, श्रुति, शुद्ध व विकृत स्वर, या विषयांचें निरूपण केलें आहे.

[ या ग्रंथाची जी नकल मिळाली, तींत अशुद्ध स्थलें बरींच दिसलीं.
त्येक ठिकाणीं—पण थोड्या ठिकाणीं -कांहीं श्लोक त्रुटितही दिसले. कोठें
दर्भाच्या धोरणानें कांहीं शब्दही घालावे लागले आहेत. ]

**अथ वीणाप्रकरणे तृतीये प्रतिपाद्यते ।**
**वीणाप्रशंसा वीणाया मेलनप्रक्रिया ततः ॥**
**प्रमाणकरणं शुद्धविकृतस्वरसंहतेः ॥**

**भावार्थः**—तिसऱ्या वीणाप्रकरणांत वीणाप्रशंसा, वीणामेलनप्रक्रिया—ह्मणजे वीणेवरील स्वर मिळविण्याची रीति वगैरे,—शुद्ध व विकृत स्वरांचें प्रमाणकरण ( सिद्ध करणें ) यांविषयीं सांगितलें आहे.

**शुद्धमेलाख्यवीणादौ मध्यमेलाव्हया ततः ।**
**तृतीयाच्युतराजेंद्रमेलवीणेति लक्षिता ॥**

**भावार्थः**—प्रथमतः शुद्धमेळवीणा सांगितली आहे, तदनंतर मध्यमेलवीणेचें वर्णन केलें आहे. पुढें मग अच्युतराजेंद्रमेलवीणेविषयीं सांगितलें आहे.

[ टीप. या ग्रंथांत आह्मीं वीणाप्रकरण सांगितलें नाहीं. त्याचें उत्तम वर्णन रागविबोधाच्या दुसऱ्या विवेकांत सांपडण्याजोगें आहे. तो ग्रंथ आता छापलेला आहे. ]

**अथमेलप्रकरणे तुरीये प्रतिपाद्यते ।**
**मेलानां विंशति भेदा रागास्तन्मेलसंभवाः ॥**

**भावार्थः**—चवथ्या मेलप्रकरणांत मेलांचे वीस भेद व त्यांतून उत्पन्न होणारे राग, यांचें वर्णन केलें आहे.

**उत्तरेतु प्रकरणे पंचमे प्रतिपाद्यते ।**
**रागाणांच त्रयो भेदा उत्तमाधममध्यमाः ॥**

**भावार्थः**—शेवटच्या पांचव्या प्रकरणांत रागांचे उत्तम मध्यम अधम असे तीन भेद सांगितले आहेत.

उत्तमानां मध्यमानां रागाणां लक्षणं ततः।
अधमानां तु केषांचिदेतावान् वस्तुसंग्रहः॥

**भावार्थः**—त्यानंतर उत्तम व मध्यम रागांची लक्षणें दिलीं आहेत. त्याचप्रमाणें कांहीं अधम रागांचींही लक्षणें सांगितलीं आहेत. असा या ग्रंथाचा वस्तुसंग्रह आहे.

इतिश्रीमदभिनवभरताचार्यवाग्गेयकारतोडरमल्लतिम्मामात्य-
नंदनरामामात्यनिर्मिते स्वरमेलकलानिधौ
उपोद्घातप्रकरणं संपूर्णम्

---

सं

# स्वरप्रकरणम्

—०—

**सामवेदादिदं गीतं सञ्जग्राह पितामहः ।**
**गीतेन प्रीयते देवः सर्वज्ञः पार्वतीपतिः ॥**

**भावार्थः**—ब्रह्मदेवानें सामवेदांतून संगीत उत्पन्न केलें. पार्वतीपति महादेव गीतानें नेहमीं संतुष्ट होत असतो.

**गोपीपतिरनंतोऽपि गीतध्वनिवशंगतः ।**
**सामगीतरतो ब्रह्मा वीणासक्ता सरस्वती ॥**

**भावार्थः**—गोपीपति जो अनंत तोही गीतध्वनिवश आहे. ब्रह्मदेव सामगीतरत आहे, म्हणजे त्याला सामगान फारच प्रिय आहे. सरस्वती वीणेवर आसक्त आहे.

**किमन्ये यक्षगंधर्वदेवदानवमानवाः ।**

**भावार्थः**—मग इतर जे यक्ष, गंधर्व, देव, दानव, मानव यांची काय कथा ?

**अज्ञातविषयास्वादो बालः पर्यंकिकातले ।**
**रुदन् गीतामृतं पीत्वा हर्षोत्कर्षं प्रपद्यते ॥**

**भावार्थः**—ज्याला अजून कोणत्याही प्रकारचा विषयास्वाद घडलेला नाहीं, असा लहान बाल जर बिछान्यांत रडत असला, तर त्याच्या कानी गीतामृत पडल्याबरोबर तो हर्ष पावतो.

**वनेचरस्तृणाहारश्चित्रमृगशिशुः पशुः ।**
**लुब्धो लुब्धकसंगीते गीते यच्छति जीवितम् ॥**

**भावार्थः**—चित्रमृगाचें लहान पोर, हें तर एक जंगलांत फिरणारा व गवत खाणारा पशु आहे, परंतु तेंही पारध्याच्या संगीतावर लुब्ध होऊन आपला प्राण अर्पण करितें.

**कृष्णसर्पोऽपि तद्गीतं श्रुत्वा हर्षं प्रपद्यते ।**
**तस्य गीतस्य माहात्म्यं के प्रशंसितुमीशते ॥**

**भावार्थः**--कृष्णसर्प देखील गीत ऐकून हर्ष पावतो. तेव्हां अशा त्या गीताचें माहात्म्य यथायोग्य कोण वर्णू शकतील ?

**गांधर्वस्वरसंदर्भो गीतमित्यभिधीयते ।**
**गांधर्वं गानमित्यस्य भेदद्वयमुदीरितम् ॥**

**भावार्थः**--गांधर्व स्वरसमुदायाला गीत ह्मणतात. गीताचे दोन भेद आहेत. १ ला गांधर्व, २ रा गान.

[ टीप. हा श्लोक रत्नाकरांतून घेतला असावा. तेथें " रंजकःस्वरसंदर्भः " असें ह्मटलें आहे. ]

**अनादिसंप्रदायं यद्गंधर्वैः संप्रयुज्यते ।**
**नियतं श्रेयसो हेतु स्तद्गांधर्वं प्रचक्षते ॥**

**भावार्थः**--जें अनादिसंप्रदाय ( अपौरुषेय ) असून ज्याचा प्रयोग गंधर्व करितात, तें सतत मोक्षहेतुभूत गीत " गांधर्व " होय.

**यत्तु वाग्गेयकारेण रचितं लक्षणान्वितम् ।**
**देशीरागादिभिः प्रोक्तं तद्गानं जनरंजनम् ॥**

**भावार्थः**--जें वाग्गेयकारांनीं ( पंडितांनीं ) निरनिराळ्या लक्षणांनीं रचून तयार केलेलें, ज्यांत देशीरागादिकांचा समावेश होतो, व जें जनरंजक असतें, त्याला " गान " ह्मणतात.

**तत्र लक्ष्मानुरोधेन गांधर्वं संप्रयुज्यते ॥**

**भावार्थः**--गांधर्व गीत सदा लक्षणाला अनुसरूनच असलें पाहिजे, असा नियम आहे.

**यत्र लक्ष्मपरित्यागे प्रत्यवायो न विद्यते ।**
**तस्माल्लक्ष्यप्रधानं तत्तु लक्ष्मप्रधानकम् ॥**
**परित्यागेऽत्र लक्ष्यस्य रंजनं नैव जायते ।**
**तस्माल्लक्ष्यानुरोधेन गानं लोके प्रवर्तते ॥**

**भावार्थः**— ज्या गीतांत अंमळ लक्षणाचा त्याग घडला तरी फारसा दोष नसतो, तें लोकांत " गान " मानिलें आहे. गान हें लक्ष्यप्रधान आहे, लक्षमप्रधान नाहीं. त्यांत लक्ष्याकडे दुर्लक्ष्य झालें, कीं त्यांतला रक्तिगुण कमी होतो. ह्मणूनच " गान " हें सदा लक्ष्याच्या अनुरोधानें असावें, असें मानितात.

**सर्वसंगीतशास्त्रार्थवेदिना शार्ङ्गसूरिणा ।**
**गीते लक्ष्यप्रधानत्वं वाद्याध्याये निरूपितम् ॥**

**भावार्थः**—सर्व संगीतशास्त्रपारंगत शार्ङ्गदेव पंडितानें आपल्या ( रत्नाकराच्या ) वाद्याध्यायांत गीत नेहमीं लक्ष्यप्रधान आहे, असेंच प्रतिपादन केलें आहे. ( तो असें ह्मणतो ).

**यद्वा लक्ष्यप्रधानानि शास्त्राण्येतानि मन्वते ।**
**तस्माल्लक्ष्यविरुद्धं यत्तच्छास्त्रं नेयमन्यथा ॥**

**भावार्थः**—हीं ( देशी संगीत विषयक ) शास्त्रें लक्ष्यप्रधानच मानिलीं आहेत. ह्मणून जेथें जेथें शास्त्रवाक्य लक्ष्यविरुद्ध होत असेल, तेथें तेथें तें लक्ष्याला बाधक न होईल असें करावें. ( त्याचा अर्थ लक्ष्यसाधक करावा. )

**आत्मा विवक्षमाणोऽयं मनः प्रेरयते मनः ।**
**देहस्थं वन्हिमाहन्ति सप्रेरयति मारुतम् ॥**
**ब्रह्मग्रंथिस्थितः सोऽथ क्रमादूर्ध्वपथे चरन् ।**
**नाभिहृत्कंठमूर्धास्येष्वाविर्भावयते ध्वनिम् ॥**

**भावार्थः**—आत्म्याला भाषण करण्याची इच्छा होऊन तो मनाला रित करितो. तें मन देहांतील अग्नीला चलन देतें. अग्नि वायूचें चलन करितो. ब्रह्मग्रंथींत वास करणारा वायु क्रमानें मग वर चढत जाऊन नाभि, हृदय, कंठ, मूर्धा, मुख इतक्या स्थानांतून नादाचा आविर्भाव करितो.

**नादोऽतिसूक्ष्मः सूक्ष्मश्च पुष्टोऽपुष्टश्च कृत्रिमः ।**
**इति पंचाभिधां धत्ते पंचस्थानस्थितः क्रमात् ॥**

**भावार्थः**—नाद हा पांच स्थानांच्या ठिकाणीं पांच नांवें पावतो. तीं क्रमानें अशीं आहेत. १ अतिसूक्ष्म २ सूक्ष्म ३ पुष्ट ४ अपुष्ट ५ कृत्रिम.

**व्यवहारे त्वसौ त्रेधा हृदि मंद्रोऽभिधीयते ।**
**कंठे मध्यो मूर्ध्नि तारो द्विगुणश्चोत्तरोत्तरः ॥**

**भावार्थः**—व्यवहारांत नाद तीनच प्रकारचा मानिला आहे. हृदयांतला नाद तो " मंद्र, " कंठांतला तो " मध्य " व मस्तकांतला तो " तार " जाणावा. हे नाद, एकाहून दुसरा दुप्पट ( उंच ) अशा रीतीनें समजावे.

**तस्य द्वाविंशतिर्भेदाः श्रवणात् श्रुतयो मताः ।**
**हृदभ्यंतरसंलग्ना नाड्यो द्वाविंशतिर्मताः ॥**
**तिरश्चस्तासु तावत्यः श्रुतयो मारुताहताः ।**
**उच्चोच्चतरतायुक्ताः प्रभवंत्युत्तरोत्तरम् ॥**

**भावार्थः**—नादाचे बावीस भेद मानिले आहेत. ते सारे नाद स्पष्ट श्रवण करितां येतात, ह्मणून त्यांना " श्रुति " ह्मणतात. हृदयस्थानांत एकंदर बावीस नाडी लागलेल्या आहेत. त्या आडव्या आहेत. त्यांतूनच मारुत ह्मणजे वायु याच्या आघातानें बावीस श्रुति, एकीहून दुसरी उंच, अशा तऱ्हेनें उत्पन्न होतात.

**एवं कंठे तथा शीर्षे हृदि द्वाविंशति र्मताः ।**

**भावार्थः**—हृदय, कंठ, व शीर्ष अशीं जीं तीन स्थानें मानिलीं आहेत, त्या प्रत्येक स्थानीं बावीस श्रुति आहेत.

**श्रुतिभ्यः स्युः स्वराः षड्जर्षभगांधारमध्यमाः ।**
**पंचमो धैवतश्चाथ निषाद इति सप्त ते ॥**
**तेषां संज्ञाः स रि ग म प ध नीत्यपरा मताः ॥**

**भावार्थः**--त्या बावीस श्रुतींतून षड्ज, ऋषभ, गांध, मध्यम, पंचम, धैवत व निषाद, असे सप्त स्वर उत्पन्न होतात. त्यांचीं स, रि, ग, म, प, ध, नी, अशीं दुसरीं ( संक्षिप्त ) नांवें आहेत.

**श्रुत्यनंतरभावी यः स्निग्धोऽनुरणनात्मकः ।**
**स्वतो रंजयति श्रोतृचित्तं स स्वर उच्यते ॥**

**भावार्थः**--श्रुतीच्या मागून लागलाच उत्पन्न होणारा, अनुरणन ज्याला आहे असा, व ऐकणारांच्या चित्ताचें स्वतः रंजन करूं शकेल असा स्निग्ध जो (नाद), तोच " स्वर." ( कोणी " श्रुत्यभ्यंतर " सुचवितात. )

[टीप-हा श्लोक रत्नाकरांतला आहे. कल्लिनाथ पंडितानें वरील श्लोकांतलीं विशेषणें अशीं समजाविलीं आहेत. " श्रुत्यनंतरभावी=श्रुतेश्च तुर्यादेर्मारुताघाहत्युपन्नप्रथमध्वनेरनन्तरं भावी; स्निग्धः=मन्दूग्श्राव्यः; अनुरणनात्मकः= अनुस्वाररूपः; स्वतः=सहकारिकारणनिरपेक्षम्; "

संगीत दर्पणांत या श्लोकावर अशी टीका आहे. " श्रुतेरनंतरं भवतीति श्रुत्यनन्तरभावी; अनुरणनात्मकः=प्रथमतंत्र्यामाहतायां तद्देशावच्छेदेन यः प्रथमो ध्वनिरुत्पद्यते सा श्रुतिः, यस्तु प्रथमध्वनिव्यापको ध्वनिप्रवाहस्तदनंतरं श्रूयते तदनुरणनं, तदेव आत्मा स्वरूपं यस्य सः; स्निग्धः=श्रोत्राभिरामः ; स्वतः स्वयं, अन्यानपेक्षया; "

श्रुतीविषयीं Capt. Day साहेब ह्मणतात. "The exact definition of what constituted a "Shruti" is difficult to determine, but it is thus vaguely given by the Sangeet Ratnavali:—"A Shruti is formed by the smallest intervals of sound, and is perceivable by the ear; it is of twenty-two kinds; every distinct audible sound is a Shruti; it is a Shruti because it is to be heard by the ear."

" The scales are formed from the Shrutis, four Shrutis being allotted to a major tone, three to a minor (which would appear to have been of a pitch somewhat flatter than the tone and sharper than the semitone; doubts however, exist as to whether the intervals of the Shrutis were equal or not), and two to a semitone (p. 15).

The peculiar division of the octave into twenty-two parts or Shrutis exists no longer in practice and the employment of Shrutis or intervals less than semitones is *limited to grace.*

The ragas in present use in most respects differ from those previously mentioned, and, in fact, the whole system has undergone complete change and gradual refinement, until between the ancient and modern music there exists a difference as clearly marked and perceivable to even the most casual observer, as between the modern Anglican chant and the ancient Gregorian tones. "

श्रुतींच्या विषयावर वाचकांनीं राजा सुरेंद्रमोहन टागोर यांचें एक लहानसें पुस्तक " The twenty-two Musical Shrutis of the Hindus. " आहे, तें वाचावें. त्या पुस्तकांत संस्कृत ग्रंथांचा शुद्धस्वरमेल " शंकराभरण " ( European c Scale ) ठरविण्याचा प्रयत्न केलेला आहे, तो मात्र प्राचीनग्रंथसंमत नाहीं, हें ध्यानांत ठेवावें. ]

**सुव्यक्तमेव वीणायामस्यार्थस्य निदर्शनम् ॥**

**भावार्थः**—या अर्थाचें स्पष्टीकरण वीणेवर उत्तम होत असतें.

**तत्र तुर्यश्रुतौ षड्जः सप्तम्यामृषभो मतः ।**
**ततो नवम्यां गांधार स्त्रयोदश्यां तु मध्यमः ॥**
**पंचमः सप्तदश्यां तु धैवतो विंशतिश्रुतौ ।**
**द्वाविंश्यां तु निषादः स्यात् श्रुतिष्वित्थं स्वरोद्भवः ॥**

**भावार्थः**—( रत्नाकरांत सांगितल्याप्रमाणें बावीस श्रुतियुक्त वीणेवर ) चवथ्या श्रुतीवर षड्जस्वर उत्पन्न होतो. सातवीवर ऋषभ, नववीवर गांधार तेरावीवर मध्यम, सतरावीवर पंचम, विसावीवर धैवत, व बाविसावीवर निषाद, या प्रमाणें स्वरांची उत्पत्ति समजून घ्यावी.

**ननु श्रुतिश्चतुर्थ्यादिरस्त्वेवं स्वरकारणम् ।**
**त्र्यादीनां तत्र पूर्वासां श्रुतीनां हेतुता कथम् ॥**

**भावार्थः**—( कोणी शंकाकार विचारतो ) अहो, चवथी, सातवी, नववी इत्यादि प्रत्यक्ष स्वरोत्पादक श्रुतींना स्वरकारण मानितां येईल, परंतु तिसरी, दुसरी वगैरे ज्या पूर्वश्रुति आहेत, त्यांना स्वरांचें कारण कसें मानितां येईल, बरें ?

**ब्रूम स्तुर्यातृतीयादिः श्रुतिः पूर्वाभिकांक्षया ।**
**निर्यातेऽतः श्रुतयः पूर्वा अप्यत्र हेतवः ॥**

**भावार्थः**—सांगतों. स्वर उत्पन्न करणाऱ्या श्रुति, चवथी, तिसरी वगैरे ज्या आहेत, त्या तरी मागल्या श्रुतींच्या अभिकांक्षेनेंच आहेत. ( जर पहिली, दुसरी या नसल्या तर चवथी वगैरे कोठून होतील ? ). यास्तव त्या पूर्वश्रुतींनाही स्वरकारण मानणें योग्य आहे.

**एते षड्जादयः सप्त स्वराः शुद्धाः प्रकीर्तिताः ।**
**विकृताश्चैव सप्तैवेत्येवं सर्वे चतुर्दश ॥**

**भावार्थः**—या प्रमाणें हे षड्जादिक सात स्वर सांगितले, ते शुद्ध स्वर झाले. विकृत स्वर देखील सातच आहेत; असे एकंदर ( गीतोपयोगी स्वर ) चवदा झाले.

[ टीप. स्वरमेलकलानिधींतल्या सर्व स्वरांचा नकाशा लक्ष्यसंगीतांत स्पष्ट दिलेला आहे. त्या ग्रंथांत स्वरमेलांतल्या स्वरांची हिंदुस्थानी संगीतांतल्या स्वरांशीं स्पष्ट तुलनाही केलेली आहे. ]

**ननु रत्नाकरे शार्ङ्गदेवेन विकृताः स्वराः ।**
**द्वादशोक्ताः कथं तेतु सप्तैव कथितास्त्वया ॥**

**भावार्थः**—( शंकाकार विचारतो ) अहो, शार्ङ्गदेव पंडितानें ( रत्नाकरांत ) विकृत स्वर बारा मानिले आहेत, आणि तुह्मीं ते सातच ह्मणतां, हें कसें ?

[ टीप. ही शंका बरी आहे. रत्नाकरांत शुद्धस्वर सात व विकृत स्वर बारा मानिले आहेत, ही गोष्ट खरी आहे. वाचकांस प्रथमदर्शनीं असें वाटण्याचा संभव असतो कीं, एका सप्तकांत बावीस नाद अथवा श्रुति मानून, त्यांपैकीं शार्ङ्गदेवानें एकोणीस श्रुतींना स्वर मानिले असावे. परंतु वस्तुतः शार्ङ्गदेवाचे स्वर तसे नव्हते. त्याच्या कांहीं विकृत स्वरांच्या जागा शुद्धस्वरांच्या जागांहून निराळ्या मुळींच नव्हत्या. तर मग त्यांना विकृत कां ह्मटले ? या प्रश्नाचें उत्तर आतां रामामात्य देत आहे. ]

**सत्यं लक्षणतो भेदो द्वादशानामपीष्यते ।**
**शुद्धेभ्यस्तत्र भेदस्तु सप्तानामेव लक्षितः ॥**

**भावार्थः**--( तुमची शंका ) यथार्थ आहे. केवळ लक्षणाच्या दृष्टीनें विचार केला, तर विकृत स्वर बारा बरोबर होतील. परंतु ज्यांच्या जागा ( ध्वनीनें ) शुद्धस्वरांच्या जागांहून भिन्न होतील तेच खरे विकृत, अशा दृष्टीनें पाहिलें, तर विकृत, स्वर सातच ठरतील.

[ टीप. लक्ष्यसंगीतांत पृ. १० व १७ वर दिलेले नकाशे पहा. सतरावे पानावर रत्नाकरांतल्या शुद्ध व विकृत स्वरांचा खुलासा केलेला आहे. तेथें अच्युतषड्ज, विकृत रिषभ, अच्युत मध्यम, विकृतपंचम, व विकृत धैवत या विकृत स्वरांचीं स्थानें तपासून पाहावीं ह्मणजे रामामात्याचे बोलण्याचा भाव स्पष्ट समजेल. ]

आधारश्रुतिसंत्यागात् ध्वनिभेदः प्रकीर्तितः ।
पंचानां परिशिष्टानां स्वराणां विकृतात्मनाम् ॥
पूर्वस्वरश्रुतिग्राह्यात्वा पूर्वश्रुतिवर्जनात् ।
अपिलक्षणतो भेदे पूर्वोक्तस्वरसंहतेः ।
आधारश्रुतिनिष्ठत्वा लक्ष्यभेदो न विद्यते ॥

**भावार्थः**—आधारश्रुति ( जीवर प्रत्येक शुद्धस्वर प्रथम काईम केलेला असतो ती ) स्वरानें सोडली कीं खरा ध्वनिभेद ( विकृत स्वर ) उत्पन्न होतो. ( रत्नाकराचे बारा विकृतांत मी सातच स्वीकारितों कारण ) बाकीच्या पांच विकृत नांवांच्या स्वरांना, मागल्या स्वराची एखादी श्रुति मिळाल्यानें अथवा स्वतःची पूर्वश्रुति सुटल्यानें, लक्षण दृष्टीनें विकृत ह्मणतां येईल, परंतु जेथपर्यंत त्यांच्या आधार श्रुति सुटणार नाहींत, तेथपर्यंत खरें विकृतत्व ( ध्वनिभेद ) मानितां येणार नाहीं.

कथं न भेद इति चेत् सलक्ष्यं तन्निरूप्यते ॥

**भावार्थः**—कां मानितां येणार नाहीं ? असें ह्मणाल, तर प्रत्यक्ष उदाहरणानेंच तें समजावितों. ( नकाशा पहा ).

शुद्धषड्जादच्युतस्तु स षड्जो नैव भिद्यते ।
अच्युतो मध्यमः शुद्धान्मध्यमान्न भिदां भजेत ॥
शुद्धर्षभाच्च विकृतो रिषभो न पृथग्भवेत् ।
विकृतो धैवतः शुद्धाद्धैवतान्नातिरिच्यते ॥
मध्यमश्रुत्युपादाने विकृतः पंचमस्तु यः ।
विकृताच्चैव पंचमान्नभेदं चाश्नुते ध्रुवम् ॥
तस्माच्चतुर्दशस्वेवं पूर्वोक्तेष्वेव पंचकः ।
अंतर्भूतो यतस्तस्मान्न पृथक् कथितो मया ॥

**भावार्थः**—( लक्ष्यसंगीत पृ. १७ वरील नकाशावर तुह्मीं नीट पाहिलें तर असें दिसेल कीं ) “ अच्युत षड्ज ” हा विकृत मानिलेला

स्वर शुद्धषड्जाहून मुळीच निराळा नाहीं. ( दोहोंचा ध्वनि एकच आहे. ) तसेंच, अच्युत मध्यम व शुद्धमध्यम यांतही ध्वनिभेद नाहीं.

विकृत रिषभ स्वर शुद्धाहून निराळा नाहीं, व विकृत धैवतस्वर शुद्ध धैवताहून पृथक् नाहीं.( संगीत दर्पणाचें भाषांतर पहा. )

मध्यमाची ( रिकामी पडलेली ) एक श्रुति घेऊन जो विकृत पंचम ( चतुःश्रुतिक ) होतो, तो विकृतपंचमाहून ( मध्यम ग्रामांत तीन श्रुतींचा पंचम असतो ) भिन्न नाहीं.

या प्रमाणें मीं सांगितलेल्या चवदा स्वरांत ( रत्नाकरांतल्या त्या ) पांच स्वरांचा अंतर्भाव होतो, ह्मणून ते मी निराळे मानीत नाहीं.

**सप्तानां विकृतानां तु संदेशं लक्ष्म चक्ष्महे ।**
**च्युतः षड्जश्च्युतोमश्च च्युतः स्यात् पंचमस्तथा ॥**
**स्यात् साधारणगांधारोंऽतरगांधार एवच ।**
**स्यात् कैशिकनिषादोऽथान्यः काकलीनिषादकः ॥**

**भावार्थः**—आतां त्या सात विकृत स्वरांचीं नांवें व लक्षणें सांगतों. १ च्युतषड्ज २ च्युतमध्यम ३ च्युतपंचम ४ साधारणगांधार ५ अंतरगांधार ६ कैशिकनिषाद ७ काकली निषाद.

[टीप. या रामामात्याच्या विकृत स्वरांची वाचकांस उत्तम कल्पना व्हावी ह्मणून ते स्वर आपल्या प्रचलित हिंदुस्थानी पद्धतींतल्या कोणत्या स्वरांशीं समान होतील, तें सांगतों. साधारण गांधार व कैशिकनिषाद, हे क्रमानें हिंदुस्थानी कोमलगांधार व कोमल निषाद, समजावे. अंतरगांधार व काकली निषाद, हे हिंदुस्थानी तीव्रग व तीव्रनी, होतील. च्युत पंचम हा हिंदुस्थानी तीव्र मध्यम जाणावा. च्युत मध्यम स्वराची जागा अंतरगच्या वर व शुद्धमध्यमाच्या खालीं आहे, ह्मणून त्याला हिंदुस्थानी गायक अतितीव्र ग ह्मणतील. त्याच प्रमाणें च्युतषड्ज स्वराला अतितीव्र निषाद मानितां येईल. या " च्युत " स्वरांविषयीं–मुख्यत्वें करून च्युतसा व च्युतमं या स्वरां·

विषयीं—दोन पक्ष अथवा मतें आहेत. रामामात्यानें त्यांचा उल्लेख पुढें केला आहे. कोणी ह्मणतात कीं च्युतम व अंतरग हे स्वर अगदीं जवळजवळचे—एक श्रुतीच्या अंतरावरचे—असल्यामुळें, ते निराळे मानूं नये; च्युतम हा स्वर अंतर गचा प्रतिनिधि मानून घ्यावा. हें मत रामामात्यालाही पसंत आहे. दुसरे ह्मणतात कीं, हे दोन स्वर निराळे मानूं नये, हें खरें आहे, परंतु अंतरगांधाराला च्युतमचा प्रतिनिधि मानावा. हे पक्षकार असें ही विधान पुढें आणितात कीं, वीणेवर अंतर ग व च्युतम या स्वरांना निरनिराळे पडदे बांधलेले नसतात. या बोलण्यांत मर्म नाहीं, असें नाहीं. आपण हिंदुस्थानी पद्धतींत देखील अतितीव्र ग अथवा अतितीव्र नी असे स्वर वीणेवर बांधीत नाहीं. काकली नी व च्युतसा यां विषयीं निराळें सांगण्याची जरूर नाहीं. ]

**हित्वा चतुर्थीं स्वाधारश्रुतिं षड्जो यदा श्रुतिम् ।**
**तृतीयामाश्रयेदेष च्युतषड्जोऽभिधीयते ॥**
**एवं लक्षणसाम्येन च्युतमध्यमपंचमौ ।**
**शुद्धस्य मध्यमस्याथ गांधारः श्रुतिमाश्रितः ॥**
**स साधारणगांधारोंऽतरगांधार उच्यते ।**
**यो मध्यमस्य शुद्धस्य श्रुतिद्वयसमाश्रितः ॥**

**भावार्थः**—षड्जस्वर जेव्हां आपली चौथी ह्मणजे आधारश्रुति सोडून तिसऱ्या श्रुतीवर येतो, तेव्हां त्याला च्युतषड्ज संज्ञा येते. हेंच लक्षण लावून च्युतमध्यम व च्युतपंचम या स्वरांच्या जागा समजून घ्याव्या. गांधार जेव्हां मध्यमाची पहिली श्रुति घेतो, तेव्हां त्याला साधारण गांधार ह्मणतात. तसेंच, जेव्हां तो शुद्धमच्या दोन श्रुति घेतो, तेव्हां अंतर गांधार होतो.

[ टीप. इतिहास दृष्टीनें रामामात्याचा ग्रंथ रत्नाकराच्या पुष्कळ पुढें आपणांस आणून सोडतो. रत्नाकराच्या मूर्छना, ग्राम, जाति यां विषयीं

रामामात्यानें कांहींच सांगितलें नाहीं. नवें संगीत व जुनें संगीत यांत कोठें तरी व कसा तरी संबंध जोडून देण्याचा प्रयत्न त्यानें केलेला एक दोन ठिकाणीं दिसतो, परंतु आपल्या विद्वानांना तो अगदीं असंतोषकारक वाटेल. रामामात्याला रत्नाकर चांगला समजला नाहीं, असेंही जरी कोणीं ह्मटलें, तरी तें वेडगळ होणार नाहीं. षड्ज आपल्या चवथ्या श्रुतीवरून तिसरीवर उतरणारच कां ? या प्रश्नाविषयीं रामामात्य काय ह्मणतो ? एक अक्षरही नाहीं. रत्नाकरांतून त्यानें ही व्याख्या घेतली आहे. षड्जसाधारण प्रसंगीं असा प्रकार घडतो, असें तेथें ह्मटलें आहे, पण तसें कां व कोणत्या रागांत घडतें, हें रामामात्याला समजलेंच नसेल, तर तो तरी त्या विषयीं काय लिहिणार ? असें आहे तरी रत्नाकर समजल्याचा आव कोठें कोठें त्यानें घातला आहे, तो पाहून करमणूक वाटते. रामामात्याचे राग व त्यांचे स्वरमेल समजणें कठिण नाहीं, परंतु रत्नाकराचे रागांशीं त्याच्या रागांचा मेळ बरोबर बसेल कीं नाहीं, हा प्रश्न वादग्रस्तच राहील. ]

**प्रथमां शुद्धषड्जस्य निषादश्चेत् श्रुतिं श्रितः ।**
**स कैशिकनिषादाख्यः कथितो गीतवेदिभिः ॥**
**निषादः शुद्धषड्जस्याश्रयते चेच्छ्रुतिद्वयम् ।**
**स काकलीनिषादः स्यादेवं सप्तापि लक्षिताः ॥**

**भावार्थः**—निषादस्वर जेव्हां षड्जाची पहिली श्रुति घेतो तेव्हां तो कैशिक संज्ञा पावतो. तोच निषाद जेव्हां षड्जाच्या पहिल्या दोन श्रुति घेतो, तेव्हां काकली होतो. या प्रमाणें सातही विकृत स्वरांचीं लक्षणें झालीं.

**चतुर्दशस्वरेष्वेषु वक्ष्ये लक्ष्यानुसारतः ।**
**नामांतराणि केषांचिद् व्यवहारप्रसिद्धये ॥**

**भावार्थः**—आतां, व्यवहार प्रसिद्धीसाठीं, या चवदा स्वरांपैकीं कांहींना दुसरीं जीं प्रचारांत नांवें आढळतात, तीं सांगतों.

[ टीप. हीं नांवें महत्वाचीं आहेत. पुढें मेल प्रकरणांत यांचा उपयोग रामामात्यानें केलेला आहे. त्यानें या ग्रंथांत एकंदर वीस मेल ( दक्षिणेकडे मेळ ह्मणतात. ) सांगितले आहेत. पहिले पंधरा मेल सांगतांना त्यानें च्युतसंज्ञक स्वरांचा उपयोग केला आहे. शेवटल्या पांचांत काकली व अंतर हीं नांवें वापरलीं आहेत. ध्यानांत ठेवण्याची मुख्य गोष्ट ही आहे कीं, या ग्रंथकारानें सांगितलेल्या संगीतांत प्रत्यक्ष उपयोगी स्वर आपलेच ( हिंदुस्थानी पद्धतींतले ) बारा होते. त्यांचीं नांवें त्या वेळचीं होतीं, हें उघडच आहे. तीं नांवें अद्यूनही दक्षिण पद्धतींत आपल्या दृष्टीस पडतात. ]

**च्युतषड्जस्वरो लक्ष्ये निषादत्वेन कीर्तितः ।**
**च्युतषड्जनिषादाभिधानं तस्य विधीयते ॥**
**च्युतस्य मध्यमस्यापि गांधारव्यवहारतः ।**
**च्युतमध्यमगांधारसंज्ञाऽस्य क्रियते मया ।**
**च्युतपंचममाचष्टे लोका मध्यमसंज्ञया ।**
**अस्माभिः कथ्यते सोऽतश्च्युतपंचममध्यमः ॥**

**भावार्थः**—च्युतषड्ज स्वराला एक प्रकारचा निषाद मानितात, ह्मणून त्याचें नांव येथें " च्युतषड्जनिषाद " ठेविलें आहे. च्युतमध्यम स्वराला प्रचारांत गांधार मानितात, म्हणून आह्मीं त्याचें नांव " च्युत मध्यमगांधार " ठेविलें आहे. " च्युतपंचमाला " लोक मध्यम समजतात, ह्मणून त्याला आह्मीं " च्युतपंचममध्यम " ह्मणतों.

**लक्ष्येऽत्र कुत्रचिच्छुद्धगांधारस्थानमाश्रयन् ।**
**ऋषभः कीर्त्यतेऽस्माभिः पंचश्रुत्यृषभाव्हयः ॥**
**स साधारणगांधारस्थानस्थो रिषभो यदि ।**
**लक्ष्यानुसारतः प्रोक्तस्तत्षट्श्रुतिरेव सः ॥**

**भावार्थः**—प्रचारांत शुद्धगांधाराला ऋषभाचें नांव देण्यांत येतें, ह्मणून आह्मीं शुद्धगांधाराला " पंचश्रुति ऋषभ " म्हणतों. साधारणगांधाराला ही कधीं ऋषभ मानण्याची वहिवाट आहे, म्हणून लक्ष्यानुरोधानें आम्हीं त्याला " षट्श्रुति रिषभ " म्हणतों.

[ टीप. या स्वरांची आठवण उत्तम राहावी म्हणून हिंदुस्थानी पद्धतींतलीं त्यांचीं नांवें पुनः सांगूं. " च्युतषड्जनिषाद "=तीव्र नी; " च्युतमध्यमगांधार "=तीव्र ग; " च्युतपंचममध्यम "=तीव्र म; शुद्धगांधार=पंचश्रुति री=तीव्र री; साधारण ग=षट्श्रुति रि=कोमल ग; कैशिक नी=षट्श्रुति ध=कोमल नी; शुद्ध नी=पंचश्रुति ध=तीव्र ध. रामामात्याचे शुद्ध रि, शुद्ध ध, हे हिंदुस्थानी पद्धतीचे कोमल रि व कोमल ध आहेत. ]

**अथानुवादः क्रियते क्रमादुक्तस्वरावलेः ।**
**वक्ष्यमाणेऽग्रतो रागमेलने सुखबुद्धये ॥**

**भावार्थः**—आतां आपण जे सारे स्वर मागें पाहून गेलों, त्यांचीं नावें क्रमानें पुनः सांगूं. त्याच्या योगानें पुढें येणारें रागमेलन प्रकरण सुबोध होईल.

**शुद्धाः सप्तस्वराः शुद्धपूर्वया तत्तदाख्यया ।**
**विज्ञेयाः क्रमशः शुद्धषड्जः शुद्धर्षभस्ततः ॥**
**शुद्धगांधार इत्युक्तः शुद्धमध्यम इत्यपि ।**
**शुद्धपंचम इत्येवं शुद्धधैवत इत्यपि ॥**
**ततः शुद्धनिषादश्च त्येवं सप्तस्वराभिधाः ।**
**विकृताः सप्त कथ्यन्ते च्युतषड्जनिषादकः ॥**
**च्युतमध्यमगांधार श्च्युतपंचममध्यमः ।**
**स साधारणगांधारः स्यात्कैशिकनिषादकः ॥**
**स्यात् काकलीनिषाद श्चांतरगांधार इत्यपि ।**
**शुद्धगांधारके तत्र पंचश्रुत्यृषभोऽभिधा ॥**

साधारणेऽपि गांधारे षट्श्रुत्यृषभनाम च ।
अस्ति क्वचित् क्वचिद्रागमेलने गानसंमतम् ॥
शुद्धनिषादनामान्यत् स्यात् पंचश्रुतिधैवतः ।
स्यात् कैशिकनिषादेऽन्यन्नाम षट्श्रुतिधैवतः ॥
चतुर्दशस्वराश्चैते रागे रागे भवंत्यमी ।
पर्यायेण स्वराःसप्त त्रिस्थानेनाधिकाः क्वचित् ॥

भावार्थः--शुद्धस्वर तर सातच आहेत. त्यांच्या नांवांच्या मागें शुद्ध असें उपपद लावण्यांत येतें, जसें शुद्धषड्ज, शुद्धऋषभ, शुद्धगांधार, शुद्धमध्यम, शुद्धपंचम, शुद्धधैवत, शुद्धनिषाद. आतां विकृत सात स्वर सांगतों. १ च्युतषड्जनिषाद २ च्युतमध्यमगांधार ३ च्युतपंचममध्यम ४ साधारणगांधार ५ कैशिकनिषाद ६ काकलीनिषाद ७ अंतरगांधार. शुद्धगांधारालाच पंचश्रुति ऋषभ हेंही नांव आहे. साधारणगांधाराचें दुसरें नांव षट्श्रुति ऋषभ आहे. हीं नांवें कांहीं कांहीं मेलांत वापरलीं जातात. शुद्धनिषादाला पंचश्रुति धैवत असेंही ह्मणतात, व कैशिक निषादाला षट्श्रुति धैवत असेंही ह्मणतात. हे असे चवदा स्वर पर्यायानें निरनिराळ्या रागांत तीन्ही स्थानांत येत असतात. प्रत्येक मेलांत सातांहून अधिक स्वर येत नसतात.

इतिश्रीमदभिनवभरताचार्यवाग्गेयकारतोडरमल्लतिम्मामात्य-
नंदनरामामात्यनिर्मिते स्वरमेलकलानिधौ
स्वरप्रकरणं द्वितीयम्

---

# मेलप्रकरणम्

एवं प्रपंचितं लक्ष्म वीणानां तिसृणामपि ।
अनंतरं प्रवक्ष्यामो रागमेलान् यथाक्रमम् ॥

**भावार्थः**—या प्रमाणें ( शुद्धमेला, मध्यमेला, व अच्युतराजेंद्रमेला अशा ) तीन्ही वीणांचीं लक्षणें सांगून आतां आम्हीं क्रमानें रागमेल सांगतों.

देशभाषाप्रसिद्धेन रागनाम्ना विशेषितान् ।
तत्तद्रागप्रधानत्वान्मेलान् वक्ष्ये क्रमादिमान् ॥

**भावार्थः**—देशभाषाप्रसिद्ध जीं रागनामें आहेत, तींच त्या मेलांना देण्यांत आलीं आहेत, कारण त्या त्या मेलांतल्या जन्यरागांत ते प्रधान राग आहेत. ते मेल क्रमानें असे आहेत.

लक्षणं लक्ष्यते पश्चादुद्देशः क्रियतेऽधुना ।
सर्वेषु रागमेलेषु मुखारिर्मेल आदिमः ॥

**भावार्थः**—सध्यां मेलांचीं नांवें सांगूं. लक्षणें पुढें सांगूं. सर्व रागमेलांत " मुखारी " मेल पहिला मानिला आहे.

ततो मालवगौळस्य मेलः श्रीरागमेलकः ।
सारंगनाटमेलश्च मेलो हिंदोलकस्यच ॥
शुद्धरामक्रियामेलो देशाक्षीमेलकोऽपरः ।
मेलः कन्नडगौळस्य शुद्धनाट्याश्च मेलकः ॥
आहरीमेलकश्चैव नादरामक्रियापरः ।
मेलः शुद्धवराळ्याश्च रीतिगौळस्य मेलकः ॥
वसंतभैरवीसंज्ञो मेलकस्तु प्रकीर्तितः ।
केदारगौळमेलश्च हेजुज्जीमेलकस्ततः ॥

**मेलः सामवराळ्याश्च रेवगुप्तेश्च मेलकः ।**
**सामंतनाममेलश्च कांभोजीमेलकस्ततः ॥**

**भावार्थः**—२ मालवगौळमेल ३ श्रीरागमेल ४ सारंगनाट ५ हिंदोलमेल ६ शुद्धरामक्रियामेल ७ देशाक्षीमेल ८ कंनडगौळमेल ९ शुद्ध-नाटीमेल १० आहरीमेल ११ नादरामक्रियामेल १२ शुद्धवराळीमेल १३ रीतिगौळ १४ वसंतभैरवी १५ केदारगौळ १६ हेजुज्जीमेल १७ सामवराळीमेल १८ रेवगुप्ति १९ सामंतमेल २० कांभोजीमेल.

[ टीप. हे रामामात्याचे मुख्य जनक थाट झाले. दक्षिण पद्धतींत "ड" अक्षराबद्दल "ळ" पुष्कळ ठिकाणीं दिसेल. ]

**मेला विंशतिरेवैते तेषां लक्षणमुच्यते ।**

**भावार्थः**—हे वीस मेल झाले. त्यांचीं लक्षणें सांगतों.

**शुद्धसप्तस्वरैर्युक्तो मुखारीमेलको भवेत् ।**
**अस्मिन् मेले मुखारी च ग्रामरागाश्च केचन ।**
**संमतः शुद्ध इत्येष शार्ङ्गदेवविपश्चितः ॥**

**भावार्थः**—मुखारीमेलांत सातही स्वर शुद्ध लागतात. यांतून मुखारी राग व कांहीं कांहीं ग्रामराग निघतात. शार्ङ्गदेव पंडिताचा शुद्धस्वरांचा मेल, तो हाच जाणावा.

[ टीप. हा श्लोक महत्वाचा आहे. हा ग्रंथ दक्षिणेकडचा आहे, व तो सुमारें चारशें वर्षांवरचा आहे, ह्मणून रत्नाकराच्या शुद्धथाटाचा यांतला उल्लेख विचार करण्याजोगा आहे. ]

**शुद्धाः सरिमपाः शुद्धधैवतश्च ततःपरम् ।**
**च्युतमध्यमगांधार श्च्युतषड्जनिषादकः ॥**
**एतैः सप्तस्वरैर्युक्तः संमतो रागवेदिनाम् ।**
**मेलो मालवगौडस्य रामामात्येन लक्षितः ॥**

**भावार्थः**—ज्या मेलांत स रि म प ध, हे स्वर शुद्ध आहेत, च्युतमध्यमगांधार व च्युतषड्जनिषाद हेही स्वर आहेत, तो पंडितसंमत मेल, रामामात्यानें " मालवगौड " ह्मटला आहे.

[ टीप. हिंदुस्थानी पद्धतींत हा भैरव थाट होईल. रत्नाकराच्या वाद्याध्यायांत याला " तुरुष्कगौड " ह्मटलें आहे. पृ. ५६१ पहा. ]

अस्मिन्मेले संभवंति ये रागास्तानथब्रुवे ।
रागो मालवगौळाख्यो ललिता बौळिका तथा ॥
सौराष्ट्री गुर्जरी मेचबौळी च फलमंजरी ।
गुंडक्री सिंधुरामक्री छायागौळः कुरंज्यपि ॥
रागः कंनडबंगाल स्तथा मंगलकौशिकः ।
मलहरीत्यादिकास्ते रागाः केचिद्भवंत्यतः ॥

**भावार्थः**--या मेलांतून निघणाऱ्या रागांचीं नांवें सांगतों. १ मालवगौड २ ललिता ३ बहुली ४ सौराष्ट्र ५ गुर्जरी ६ मेचबौळी ७ फलमंजरी ८ गुंडक्री ९ सिंधुरामक्री १० छायागौळ ११ कुरंजी १२ कंनडबंगाल १२ मंगलकौशिक १४ मलहरी इ.

शुद्धषड्जः पंचश्रुतीरिषभश्च तथापरः ।
स्यात्साधारणगांधारः शुद्धौ पंचममध्यमौ ॥
पंचश्रुति धैवतश्च कैशिक्याख्यनिषादकः ।
एतैः सप्तस्वरैर्युक्तः श्रीरागस्यचमेलकः ॥
अस्मिन्मेले संभवन्ति ये रागास्तानथब्रुवे ।
श्रीरागो भैरवी गौळी धन्यासी शुद्धभैरवी ॥
वेलावली मालवश्रीः शंकराभरणोऽपिवा ।
आंदोली देवगांधारी मध्यमादि स्तथापरा ॥
एवमाद्याश्च कतिचिद्रागा मेलोद्भवा स्ततः ॥

**भावार्थः**—श्रीरागमेलाचे स्वर असे आहेत. १ शुद्धषड्ज २ पंचश्रुतिक ऋषभ ३ साधारणगांधार ४ शुद्धमध्यम ५ शुद्धपंचम ६ पंचश्रुतिक धैवत ७ कैशिक निषाद. श्रीरागमेलांतून जे राग निघतात त्यांचीं नांवें अशीं आहेत.

१ श्रीराग २ भैरवी ३ गौळी ४ धन्यासी ५ शुद्धभैरवी ६ वेलावली ७ मालवश्री ८ शंकराभरण ९ आंदोली (आंधाली) १० देवगांधारी ११ मध्यमादि इ.

[ टीप. हा हिंदुस्थानी संगीतपद्धतींतला काफीथाट होईल. त्या पद्धतींत आतां श्रीराग "पूर्वी" मेलांत गातात. दक्षिणेकडे अझून तो काफी थाटांतच गातात, हें ध्यानांत ठेवावें. साधारण ग व कैशिक नी हे स्वर हिंदुस्थानी कोमल ग व कोमल नी आहेत, हें सांगितलेंच आहे. वेलावली, भैरवी, शंकराभरण, हे रागही रामामात्यानें या थाटांत घातले आहेत, तें ध्यानांत असूं द्यावें. ]

**पंचश्रुत्यृषभः शुद्धषड्जमध्यमपंचमाः ।**
**पंचश्रुतिर्धैवतश्च च्युतषड्जनिषादकः ॥**
**च्युतमध्यमगांधार एतैः सप्तस्वरैर्युतः ।**
**सारंगनाटमेलोऽयं रामामात्येन लक्षितः ॥**
**तन्मेळकसमुद्भूतान् रागान् वक्ष्यामि कांश्चन ।**
**सारंगनाटः सावेरी तथा सारंगभैरवी ॥**
**नटनारायणी शुद्धवसंतः पूर्वगौळकः ।**
**स्यात्कुंतलवराळी सा भिन्नषड्जस्तथैवच ॥**
**नारायणीत्येवमाद्याः केचिद्रागा भवंत्यतः ॥**

**भावार्थः**—रामामात्यानें सांगितलेल्या "सारंगनाट" (कांहीं ग्रंथांत सालंकनाट म्हटलें आहे) मेलांत शुद्धषड्ज, पंचश्रुतिऋषभ,

च्युतमध्यमगांधार, शुद्धमध्यम, शुद्धपंचम, पंचश्रुतिधैवत, च्युतषड्जनिषाद असे स्वर लागतात. या मेलांतून जे जन्यराग निघतात ते सांगतों. १ सारंगनाट २ सावेरी ३ सारंगभैरवी ४ नटनारायणी ५ शुद्धवसंत ६ पूर्वगौळ ७ कुंतलवराळी ८ भिन्नषड्ज, ९ नारायणी इ. हे राग या मेलांतले आहेत.

[ टीप. हा थाट आपल्या हिंदुस्थानी पद्धतींतला " बिलावल " थाट होईल. रागविबोधांत " सालंकनाट " असें नांव आहे. तेथें सालंकनाट मल्लारीमेलांत आहे. मल्लारी मेलाचे स्वर वर सांगितल्या प्रमाणेंच आहेत. रागविबोधकार सोमनाथ च्युतमध्यमगांधार व च्युतषड्जनिषाद या स्वरांना " मृदुम " व " मृदुस " ह्मणतो, व त्याचप्रमाणें पंचश्रुति रि, ध यांना तीव्रतर रि, ध ह्मणतो, हें लक्ष्यांत असूं द्यावें. रामामात्याचा च्युतपंचममध्यम तो सोमनाथाचा मृदुप होईल. ]

**श्रीरागमेले यल्लक्ष्म तत्स्या द्धिंदोलमेलके ।**
**धैवतः शुद्ध एवात्र विशेषोऽयं प्रदर्शितः ॥**
**कांश्चित्तत्रोद्भवान् रागान् वक्ष्ये लक्षणसंगतान् ।**
**हिंदोलो मार्गहिंदोलो भूपालादिभिरित्यमी ॥**
**अन्येच कतिचिद्रागाः संभवंत्यत्रमेलके ॥**

**भावार्थः**—जें लक्षण वर श्रीरागमेलाचें सांगितलें आहे, तेंच बहुतेक हिंदोल मेलाचें ह्मणतां येईल, परंतु हिंदोल मेलांतला धैवत शुद्ध आहे. या मेलांतून जे राग निघतात त्यांच्या लक्षणांसुद्धां ते सांगेन. ते राग असे आहेत. १ हिंदोल, २ मार्गहिंदोल ३ भूपाळ व दुसरे कांहीं.

[ टीप. काफीथाटांत धैवत तीव्र आहे, हें आपण जाणतों. या हिंदोल थाटांत तो शुद्ध ठेवावयाचा आहे, ह्मणजे तो हिंदुस्थानी पद्धतींतला कोमल होणार आहे. तसें केल्यानें रामामात्याचा हिंदोलथाट तो हिंदुस्थानी " आसावरी " थाट होणार आहे. ]

शुद्धाःसरिपधाश्चैव च्युतपंचममध्यमः ।
च्युतमध्यमगांधार श्च्युतषड्जनिषादकः ॥
शुद्धरामक्रियामेलः स्यादेभिस्सप्तभिः स्वरैः ।
अत्रमेले संभवंति ये रागास्तानथ ब्रुवे ॥
पाडिरा शुद्धरामक्रिया बौळी ह्यार्द्रदेशीच दीपकः ।
इत्याद्याः संभवंत्यत्र मेले रागाश्च केचन ॥

**भावार्थः**—ज्यांत स रि प ध हे स्वर शुद्ध असतात, च्युतपंचमम-ध्यम, च्युतमध्यमगांधार, व च्युतषड्जनिषाद हेही स्वर असतात, तो "शुद्धरामक्रिया" मेळ जाणावा. या मेलांतले राग सांगतों. १ शुद्धरामक्री पाडि२ बौळी, ३ आर्द्रदेशी, ४ दीपक इत्यादिक राग या मेलांतून उत्पन्न होतात.

[ टीप. हा मेल आपला हिंदुस्थानी पद्धतींतला "पूर्वी" मेल होईल. दीपक या थाटांतला राग आहे, हें ध्यानांत असू द्यावें. ]

षट्श्रुत्यृषभकः शुद्धषड्जमध्यमपंचमाः ।
पंचश्रुतिर्धैवतश्च च्युतषड्जनिषादकः ॥
च्युतमध्यमगांधार श्चेत्येतत्स्वरसंयुतः ।
देशाक्षीमेलकः प्रोक्तो रामामात्येन धीमता ॥
देशाक्षीप्रमुखा रागा भवंत्यत्र कचित् कचित् ॥

**भावार्थः**—ज्या मेलांत षट्श्रुतिक ऋषभ, षड्जशुद्ध, मध्यम व पंचम शुद्ध, पंचश्रुति धैवत, च्युतषड्जनिषाद, च्युतमध्यमगांधार, असे स्वर लागतात, त्याला रामामात्य पंडित "देशाक्षी" मेळ ह्मणतो. या मेलांतून देशाक्षी प्रभृति राग निघतात.

देशाक्षी रागमेलस्य लक्षणं यदुदाहृतम् ।
मेलः कंनडगौळस्य तस्माद्भेदोऽस्ति कश्चन ॥

कैशिक्याख्यनिषादोऽत्र प्रयोज्यो लक्ष्यवेदिभिः ।
अस्मिंस्तु मेले संजातान् रागांल्लक्षणतो ब्रुवे ॥
एकः कंनडगौळाख्य स्तथा घण्टारवोऽपि च ।
शुद्धबंगालनामाच छायानाटस्ततः परः ॥
तथा तुरुष्कतोडीच नागध्वनिरतः परम् ।
देवक्रिया ह्येवमाद्या रागाः केचिद्भवंत्यतः ॥

**भावार्थः**—देशाक्षी मेलाचें जें लक्षण सांगितलें, तेंच बहुतेक कंनड-गौळाचें समजावयाचें आहे, परंतु कंनडगौळांत पंडित कैशिक निषाद वापरतात. या मेलांतून निघणाऱ्या रागांचीं नांवें व लक्षणें सांगेन. १ कंनडगौळ २ घंटारव ३ शुद्धबंगाल ४ छायानट ५ तुरुष्कतोडी ६ नाग-ध्वनि ७ देवक्रिया वगैरे कांहीं राग या मेलांतले आहेत.

शुद्धस्वरास्तु समपाः षट्श्रुत्यृषभधैवतौ ।
च्युतमध्यमगांधार श्च्युतषड्जनिषादकः ॥
स्वरैरमीभिः संयुक्तः शुद्धनाट्याश्चमेलकः ।
शुद्धनाटप्रभृतयो रागा अतो भवंतिच ॥

**भावार्थः**—ज्या मेलांत स, म, प, शुद्ध आहेत, षट्श्रुतिऋषभ आहे, षट्श्रुतिधैवत आहे, तसेंच च्युतमध्यमगांधार व च्युतषड्जनिषाद हेही स्वर आहेत, तो "शुद्धनाट" मेल मानिला आहे. त्या मेलांतून शुद्धनाट वगैरे राग निघतात.

शुद्धाः समपधाश्चैव पंचश्रुत्यृषभस्तथा ।
साधारणोऽपि गांधार श्च्युतषड्जनिषादकः ॥
स्वरैरमीभिः संयुक्त आहरीमेलको भवेत् ।
आहरीप्रमुखारागा भवेयुरिहमेलके ॥

**भावार्थः**—ज्या मेलांत स, म, प, ध हे स्वर शुद्ध असतात, पंच-श्रुतिऋषभ, साधारणगांधार, च्युतषड्जनिषाद हेही स्वर असतात, त्याला "आहरी" मेल ह्मणतात. त्यांतून आहरी वगैरे राग निघतात.

**शुद्धाः समपधा रिश्च च्युतषड्जनिषादकः ।
साधारणोऽथ गांधारः स्वैरेभिः समन्वितः ॥
नादरामक्रियामेल स्तास्मिन् रागाश्चकेचन ।
नादरामक्रियामुख्याः संभवंति कचित् कचित् ॥**

**भावार्थः**—ज्या मेलांत स म प ध रि, हे सारे स्वर शुद्ध असतात, साधारणगांधार व च्युंतषड्जनिषाद हेही स्वर लागतात, त्याला नादरामक्री मेल ह्मणतात. त्यांतून नादरामक्रिया वगैरे राग उत्पन्न होतात.

**शुद्धाः सरिपधा यत्र शुद्धगांधारसंज्ञितः ।
च्युतषड्जनिषादोऽपि च्युतपंचममध्यमः ॥
मेलः शुद्धवराळ्याश्च तत्र शुद्धवराळिका ।
अन्येच संभविष्यन्ति रागा देशविभेदतः ॥**

**भावार्थः**—ज्या मेलांत स, रि, प, ध ग हे स्वर शुद्ध असतात, च्युतषड्जनिषाद व च्युतपंचममध्यम हेही स्वर असतात, त्याला "शुद्धवराळी" मेल ह्मणतात. या मेलांतून शुद्धवराळी व कांहीं देशीरागांची उत्पत्ति सांगितली आहे.

**शुद्धाः सरिगमाः पश्च पंचश्रुतिकधैवतः ।
कैशिक्याख्यनिषादश्चेत्येतै र्युक्तः स्वैरस्तु यः ॥
स रीतिगौळमेलः स्याद्रीतिगौळादयोऽत्र च ।
रागाः केचिद्भवंतीति संमतं गानवेदिनाम् ॥**

**भावार्थः**—ज्यांत स रि ग म प हे स्वर शुद्ध असतात, पंचश्रुतिक धैवत व कैशिक निषाद हेही स्वर असतात, त्याला "रीतिगौळ" मेल हें नांव दिलें आहे. या मेलांतून रीतिगौळ वगैरे राग निघतात, असें पंडितांचें मत आहे.

**च्युतमध्यमगांधारः कैशिक्याख्यनिषादकः ।
शुद्धाःसरिमपा धश्च स्वैरेभिः समन्वितः ॥**

वसंतभैरवीमेल स्तस्मिन् रागाश्च केचन ।
वसंतभैरवीसोमरागप्रभृतयो मताः ॥

भावार्थः—ज्यांत स रि म प ध, हे स्वर शुद्ध असतात, च्युतमध्यमगांधार व कैशिक निषाद हेही स्वर येतात, तो वसंतभैरवी मेल जाणावा. त्या मेलांतून वसंतभैरवी, सोम, वगैरे राग उत्पन्न होतात.

शुद्धाश्च समपाः पंचश्रुती चर्षभधैवतौ ।
च्युतमध्यमगांधारश्च्युतषड्जनिषादकः ॥
केदारगौळमेलः स्यात् स्वरैरेभिः समन्वितः ।
तस्मिन् केदारगौळश्च स्यान्नारायणगौळकः ॥
एवमाद्याः संभवंति मेले रागाः कचित् कचित् ॥

भावार्थः—ज्यांत स म प शुद्ध आहेत, पंचश्रुतिक रि ध आहेत, च्युतमध्यमगांधार व च्युतषड्जनिषाद हेही स्वर आहेत, तो केदारगौळ मेल जाणावा. त्यांतून केदारगौळ, नारायणगौळ वगैरे कांहीं कांहीं राग उत्पन्न होतात.

मेलाः पंचदश प्रोक्ताः काकल्यंतरवर्जिताः ।
काकल्यंतरसंयुक्तान् पंचमेलान् प्रचक्ष्महे ॥

भावार्थः—असे हे पंधरा मेल आम्हीं सांगितले. त्यांत काकली व अंतर स्वर नव्हते. आतां ते दोन स्वर ज्यांत आहेत, असे मेल सांगतों.

शुद्धौ च षड्जरिषभौ शुद्धाश्चमपधास्तथा ।
गांधारोंऽतरसंज्ञश्च काकल्याख्यनिषादकः ॥
एतावत्स्वरसंयुक्तो हिजूजीमेलको भवेत् ।
हिजूज्याद्या भवंत्यत्र ग्रामरागाश्च केचन ॥
इत्येव शार्ङ्गदेवस्य संमतो मार्गवेदिनः ॥

भावार्थः—ज्यांत स रि म प ध, हे स्वर शुद्ध असतात, अंतरगांधार व काकलीनिषाद हेही ज्यांत असतात, तो हिजूजी मेल म्हटला आहे.

या मेलांतून हिजूजी, व कांहीं ग्रामराग उत्पन्न होतात. मार्गसंगीतनिष्णात शार्ङ्गदेवाचा हेजूजी मेल हाच समजावा.

[ टीप. हा श्लोक महत्वाचा मानतात. त्यांत रत्नाकरांतील हेजूजी रागाच्या स्वरूपाचा उल्लेख रामामात्यानें केला आहे. त्यानें आपल्या विधानाला आधार अथवा पुरावा कांहींच दिलेला नाहीं, ही दिलगिरीची गोष्ट आहे, परंतु तेथें आतां कोणाचा इलाज आहे ? या उल्लेखावरून त्या ग्रंथकाराच्या वेळीं रत्नाकराच्या हेजूजीचे स्वरूपाविषयीं काय प्रचारांत समजूत होती, इतकेंच समजेल. रामामात्यानंतर थोडेच वर्षांनीं व्यंकटमखी पंडित झाला. त्यानें रामामात्याच्या मेलांवर फार कडक टीका केली आहे. ]

**शुद्धाः सारिगमाश्चाथ शुद्धौ पंचमधैवतौ ।**
**निषादः काकलीसंज्ञो ह्येतैः सप्तस्वरैर्युतः ॥**
**मेलः सामवराळ्याख्य स्तस्मिन् सामवराळिका ।**
**अन्येच संभविष्यंति रागा इति विदां मतम् ॥**

**भावार्थः**—ज्यांत स रि ग म प ध, हे स्वर शुद्ध आहेत, व ज्यांत निषाद काकली आहे, तो " सामवराळी " मेल म्हटला आहे. त्यांतून सामवराळी वगैरे राग निघतात, असें पंडित म्हणतात.

**शुद्धाः सारिमपाः शुद्धधनी गांधारकोंऽतरः ।**
**एतैः सप्तस्वरै रेवगुप्तिमेल उदाहृतः ॥**
**तस्मिन् रागो रेवगुप्तिः शुद्धरागाश्च केचन ।**
**रत्नाकरीयमेलोत्थाः शार्ङ्गदेवेन लक्षिताः ॥**

**भावार्थः**—ज्यांत स रि म प ध नि, हे स्वर शुद्ध असतात, व ज्यांत गांधार अंतर नांवाचा आहे, तो " रेवगुप्ति " मेल मानावा. यांतून रेवगुप्ति राग व शार्ङ्गदेवाच्या रत्नाकरांतले कांहीं कांहीं राग निघतात.

**रिधौ षट्श्रुतिकौचैव काकल्यंतरनामकौ ।**
**शुद्धाः षड्जमपा एतैः स्वरैर्युक्तोभवेद्यदा ॥**
**तदा सामंतमेलः स्यात् तत्र रागास्तदादयः ॥**

**भावार्थः**—ज्यांत स म प, हे शुद्ध आहेत, रि, ध षट्श्रुतिक आहेत, काकली व अंतर स्वरही आहेत, तो " सामंत " मेल म्हटला आहे. त्यांतून सामंतादिक राग उत्पन्न होतात.

**गनीचांतरकाकल्यौ रिधौ पंचश्रुती तथा ।**
**शुद्धास्तुसमपाश्चैव ह्येतैः कांभोजिमेलकः ॥**
**कांभोजीप्रमुखा रागा मेलेऽस्मिन् संभवंतिहि ॥**

**भावार्थः**—कांभोजी मेलांत स म प, शुद्ध आहेत, गांधार व निषाद अंतर व काकली आहेत, रिषभ व धैवत पंचश्रुतिक आहेत; या मेलांतून कांभोजी वगैरे राग निघतात.

**लक्षिता विंशतिर्मेला गात्रे स्युर्नियता अमी ।**
**पक्षद्वयं तु वीणायां वक्ष्यते लक्ष्यसंमतम् ॥**

**भावार्थः**—असे हे गळ्यानें गातां येणारे वीस मेल सांगितले. प्रचारांत वैणिकांत दोन पक्ष आहेत, तेही सांगतों.

**ग्राह्यादंतरकाकल्योः स्वरूपे पृथक् पृथक् ।**
**पक्षोऽयं प्रथमस्तत्र मेलाः स्युर्विंशति ध्रुवम् ॥**

**भावार्थः**—अंतर व काकली हे दोन स्वर ( च्युत ग व च्युत नी या स्वरांहून ) निराळे प्रत्यक्ष संगीतांत मानल्यानें, एकंदर मेल वीस होतात. हा पहिला पक्ष आहे.

**अंतरस्य च काकल्याः स्थाने प्रतिनिधिः क्रमात् ।**
**च्युतमध्यमगांधार श्च्युतषड्जनिषादकः ॥**
**अयंद्वितीयः पक्षोऽत्रमेलाः पंचदश स्मृताः ॥**

**भावार्थः**—दुसरा पक्ष असें ह्मणतो कीं, अंतर व काकली हे स्वर निराळे न मानितां, च्युतमध्यमगांधार व च्युतषड्जनिषाद या स्वरांतच त्यांचा अंतर्भाव समजून घ्यावा. अशा दृष्टीनें पाहिलें ह्मणजे, ( रामामात्याचे शेवटचे पांच मेल निराळे मानण्याची जरूर न पडून ) मेल १५ च होतील.

[ टीप. रामामात्यालाही हें अंतर्भाव–तत्व पसंत होतें. त्यानें आपल्या मताला दृढ करण्याकरितां शार्ङ्गदेवाच्या " साधारण प्रकरणांतल्या एक दोन श्लोकांचा आधार घेतला आहे. तो ह्मणतो.

**" एतदेवाभिसंधाय कथितं शार्ङ्गसूरिणा ।**
**अल्पप्रयोगः सर्वत्र काकली चांतरस्वरः ॥ "**

शार्ङ्गदेवानें अंतर व काकली या स्वरांचा उपयोग स्वतः रागाध्यायांत ठिकठिकाणीं केलेला आहे, हें मात्र येथें सांगितलें पाहिजे. रामामात्यानें रत्नाकरांतील श्लोकांचा अर्थ बरोबर केला आहे कीं काय, हा प्रश्न निराळाच आहे. सध्यां आपण " स्वरमेलकलानिधीचा " खुलासा करीत आहों. प्रत्येक संस्कृतभाषा पंडिताला प्राचीन संस्कृत ग्रंथांतला संगीत विषय देखील उत्तम समजलाच पाहिजे असा नियम आपण कोठें मानण्यास तयार असतों ? असो. ]

**अत्र प्रतिनिधेः पक्षे मुखारीमेलपूर्वकाः ।**
**केदारगौळमेलान्ता मेलाः पंचदश स्मृताः ॥**

**भावार्थः**—( ह्मणून ) येथें प्रतिनिधि पक्षाप्रमाणें " मुखारी " पासून " केदारगौळ " पर्यंत पंधराच मेल सांगितले आहेत.

इतिश्रीमदभिनवभरताचार्यवाग्गेयकारतोडरमल्लतिम्मामात्य-
नंदनरामामात्यनिर्मितस्वरमेलकलानिधौ
मेलप्रकरणं चतुर्थम्

---

# रागप्रकरणम्

एतेषु वा मता रागा उत्तमा मध्यमा अपि ।
अधमाश्चापि सकलाः कथ्यंते ते विवेकतः ॥

**भावार्थः**—त्या मीं सांगितलेल्या मेलांतून जे जन्य राग निघतात, त्यांचे उत्तम, मध्यम, व अधम, असे तीन वर्ग मानिले आहेत. ते राग आतां सविस्तर सांगितले जातील.

मुखारी शुद्धनाटीच तथा मालवरागकः ।
ततः शुद्धवराळीच गुर्जरी ललितस्तथा ॥
शुद्धरामक्रियाशुद्धवसंतौ भैरवी तथा ।
हिंदोलरागश्रीरागौ रागः कन्नडगौळकः ॥
सामंतरागो देशाक्षी धन्यासी बौळिकेतिच ।
आहरीचापि मल्लारी मालवश्री स्ततःपरम् ॥
सारंगनाटीतिरागाः कथिताश्चोत्तमोत्तमाः ।
असंकीर्णतया लोके रागा विंशतिरेवच ॥
गीतप्रबंधकालापयोग्या एते भवंति हि ॥

**भावार्थः**—मुखारी २ शुद्धनाटी ३ मालव ४ शुद्धवराळी ५ गुर्जरी ६ ललित ७ शुद्धरामक्रिया ८ शुद्धवसंत ९ भैरवी १० हिंदोल ११ श्रीराग १२ कंनडगौळ १३ सामंत १४ देशाक्षी १५ धन्यासी १६ बौळी १७ आहरी १८ मल्लारी १९ मालवश्री २० सारंगनाटी.

हे वीस राग "उत्तम" या वर्गांत घातले आहेत. हे सारे संकीर्ण नसून गीत, प्रबंध, आलाप वगैरे गाण्यास योग्य मानिले आहेत.

[ टीप. " रागविबोध " या नांवाचा सोमनाथ पंडिताचा ग्रंथ आतां छापून प्रसिद्ध झाला आहे. त्या ग्रंथाच्या चवथ्या विवेकांत पृ. ५ वर जी टीका आहे, तींत रामामात्याचें हें वर्गीकरण दिलेलें आहे. तेथें दिलेले उत्तम, मध्यम, अधम राग हुबेहूब रामामात्याचेच क्रमानें सांगितले आहेत. ]

**केदारगौळः कांभोजी बंगालः कन्नडाव्हयः ।**
**वेलाख्या मध्यमादि नारायणी रीतिगौळकः ॥**
**नादरामक्रिया पाडि भूपाली रेवगुप्तिकः ।**
**गुंडक्रिया हिजूजीच वसंतादिश्च भैरवी ॥**
**रागः सामवराळिश्चेत्येते पंचदशैव च ।**
**लोकेऽबहुव्यवहाराः कीर्तिता मध्यमा बुधैः ॥**

**भावार्थः—**केदारगौळ, कांभोजी, बंगाल ( कंनडबंगाल ) वेलावली, मध्यमादि, नारायणी, रीतिगौड, नादरामक्रिया, पाडी, भूपाली, रेवगुप्ति, गुंडक्रिया, हिजूजी, वसंतभैरवी, सामवराळी, असे हे पंधरा राग, पंडितांनीं " मध्यम " या वर्गांत मानिले आहेत. ( हे राग आलापादिकांना योग्य असूनही ) ते, लोकांत फारसे प्रचलित नसल्यामुळें, त्या वर्गांत घातले गेले आहेत.

**सौराष्ट्रो मेचबौळीच छायागौळः कुरंजिका ।**
**सिंधुरामक्रिया गौडी देशी मंगलकौशिकः ॥**
**पूर्वगौळ स्सोमराग आंधाली फलमंजरी ।**
**शंकराभरणो देवगांधारी दीपकस्तथा ॥**
**नटनारायणी शुद्धभैरवी भिन्नषड्जकः ।**
**स्यात् कुंतलवराळीच रागः सारंगभैरवी ॥**
**शुद्धबंगालको नागध्वनि घंटारवस्तथा ।**
**मार्गहिंदोलक श्छायानाटी देवक्रियापिच ॥**

नारायणी गौळराग स्ततस्तोडी वराळिका ।
तुरुष्कतोडीरागश्च रागः सावेरिका तथा ॥
आर्द्रदेशीत्यादयश्च रागाः स्युरधमाः क्रमात् ॥
सर्वेष्वेतत्पुरोक्तेषु मध्यमेषूत्तमेषुच ।
अंतर्भूताश्च संकीर्णाः पामरभ्रामकाश्चते ॥
रागास्तावत् प्रबंधानामयोग्या बहुलाश्चते ॥
तस्मान्नते परिग्राह्या रागाः संगीतकोविदैः ॥

**भावार्थः**—पुढील राग " अधम " मानिले आहेत. १ सौराष्ट्र २ मेचबौळी ३ छायागौळ ४ कुरंजी ५ सिंधुरामक्रिया ६ गौडी ७ देशी ८ मंगलकौशिक ९ पूर्वगौड १० सोमराग ११ आंधाळी १२ फलमंजरी १३ शंकराभरण १४ देवगांधारी १५ दीपक १६ नटनारायणी १७ शुद्धभैरवी १८ भिन्नषड्ज १९ कुंतलवराळी २० सारंगभैरवी २१ शुद्धबंगाल २२ नागध्वनि २३ घंटारव २४ मार्गहिंदोल २५ छायानाटी २६ देवक्रिया २७ नारायणी २८ गौळराग २९ तोडी ३० वराळी ३१ तुरुष्कतोडी ३२ सावेरी ३३ आर्द्रदेशी ३४ इ. हे सारे राग " अधम " मानिले आहेत. वर जे " उत्तम, मध्यम, व अधम " राग सांगितले, त्यांतच पामरांना ( साधारण लोकांना ) भ्रमांत पाडणारे असे जे संकीर्णराग, त्यांचाही समावेश होतो. प्रबंधादिकांना अयोग्य असे राग तर असंख्यच आहेत, ह्मणून त्यांचा विचार संगीत पंडित बहुधा करीत नाहींत. त्यांचें सविस्तर निरूपण दुःसाध्यही आहे.

देशीरागाश्च सकलाः षड्जग्रामसमुद्भवाः ।
ग्रहांशन्यासमंद्रादिषाडवौडवपूर्णताः ॥
देशीत्वात्सर्वरागेषु भवंति न भवंति वा ।
तथापि लक्ष्यमाश्रित्य लक्ष्यज्ञाननुसृत्यच ॥

**विंशत्युत्तमरागाणामसंकीर्णस्वरूपिणाम् ।**
**मध्यमानां तथा पंचदशानां च ततः परम् ॥**
**अधमानां च केषांचिल्लक्षणं लक्ष्यतेऽधुना ॥**

**भावार्थः**—सर्व देशीराग षड्जग्रामांतूनच उत्पन्न होत असतात, यास्तव त्यांत ग्रह, अंश, न्यास, मंद्र, षाडवत्व, ओडवत्व, संपूर्णत्व वगैरे प्राचीन ग्रंथोक्त रागलक्षणें यथाशास्त्र दृष्टीस पडतीलच असा नियम नाहीं. तथापि लक्ष्य व लक्ष्यज्ञ यांना अनुसरून, उत्तम मानिलेले असंकीर्ण वीस राग, " मध्यम " वर्गांतले पंधरा राग, व " अधम " या वर्गांतले कांहीं राग, इतक्यांचीं लक्षणें आह्मीं आतां सांगणार आहों.

**संपूर्णस्वरसंयुक्तः षड्जन्यासग्रहांशकः ।**
**यो गेयः पश्चिमे यामे नाटीरागः स उच्यते ॥**

**भावार्थः**—नाट रागांत ग्रह, अंश, न्यास षड्ज आहे, तो राग संपूर्ण असून शेवटल्या प्रहरीं गावयाचा आहे.

**षड्जांशा सग्रहा षड्जन्यासा संपूर्णतांगता ।**
**सर्वयामेषु या गेया सा वराळीतिकीर्तिता ॥**

**भावार्थः**—वराळींत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे, व ती संपूर्ण आहे. ती हव्या त्या प्रहरीं गातां येते.

**सारंगनाटी संपूर्णा सन्यासा सग्रहापिच ।**
**षड्जांशा पश्चिमे यामे गातव्या कथिता बुधैः ॥**

**भावार्थः**—सारंगनाट संपूर्ण आहे, व त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. तो शेवटल्या प्रहरीं गावा असें पंडित ह्मणतात.

**शुद्धरामक्रियारागः संपूर्णः सग्रहोऽपिच ।**
**षड्जांशन्याससंयुक्तो गेयो मध्यंदिनात्परम् ॥**

**भावार्थः**—शुद्धरामक्रियाराग संपूर्ण आहे. त्यांत षड्ज ग्रह अंश, न्यास आहे. तो दोन प्रहरांनंतर गावा.

**सग्रहा सांशिका षड्जन्यासा संपूर्णतां गता ।**
**मुखारी सर्वकालेषु गानयोग्या प्रकीर्तिता ॥**

**भावार्थः**--मुखारींत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. तो राग संपूर्ण असून हवा तेव्हां गातां येतो.

**संपूर्णो भैरवीरागः सन्यासः सांशको मतः ।**
**षड्जग्रहस्तथा गेयो यामे यः पश्चिमे च सः ॥**

**भावार्थः**—भैरवीराग संपूर्ण आहे. त्यांत ग्रह, अंश, न्यास षड्ज आहे. तो शेवटल्या प्रहरीं गातात.

**सन्यास आहरीरागः सांशः षड्जग्रहोऽपिच ।**
**संपूर्ण श्चरमे यामे गातव्योऽसौ विचक्षणैः ॥**

**भावार्थः**--आहरी राग संपूर्ण आहे. त्यांत षड्ज ग्रह अंश, न्यास आहे. तो शेवटल्या प्रहरीं पंडित गातात.

**सामंतरागः षड्जांशः षड्जन्यासश्च सग्रहः ।**
**दिनस्य चरमे यामे गेयः संपूर्णतायुतः ॥**

**भावार्थः**—सामंत राग संपूर्ण आहे, व त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. तो संध्याकाळीं गावा.

**निधांशकग्रहोपेतो रागः कन्नडगौळकः ।**
**संपूर्णोऽपि कदाचित् स्यादारोहे त्यक्तमध्यमः ॥**
**गेयोह्नः पश्चिमे यामे उत्कलानामतिप्रियः ॥**

**भावार्थः**—कन्नडगौळ रागांत निषाद व धैवत अंश व ग्रह आहेत; तो संपूर्ण आहे. कोणी आरोहांत मध्यम वर्ज करितात. तो शेवटल्या प्रहरीं गावा. हा राग उत्कलांना ( ओरिसा प्रांतातील लोकांना ) फार प्रिय आहे.

**सन्यासः सग्रहः पूर्णो देशाक्षीराग उच्यते ।**
**आरोहे मनिवर्जोऽसौ पूर्वयामे च गीयते ॥**

**भावार्थः**—देशाक्षीराग संपूर्ण आहे व त्यांत षड्ज ग्रह व न्यास आहे. आरोहांत म, नि वर्जित करण्यांत येतात. तो पहिल्या प्रहरीं गातात.

**मध्यमांशग्रहन्यासा पंचमेनविवर्जिता ।**
**बौळिका स्यात् षाडवा सा गातव्या पूर्वयामके ॥**

**भावार्थः**—बौळिका राग षाडव आहे. त्यांत पंचम वर्जित आहे व तो पहिल्या प्रहरीं गावा.

[ टीप. इतर ग्रंथांत या रागांत "मध्यम" वर्ज करण्याचा स्वर म्हटला आहे. ]

**रागः शुद्धवसंताख्यः सन्यासः सग्रहोऽपिच ।**
**गीयते सर्वयामेषु सर्वदा मंगलप्रदः ॥**

**भावार्थः**—शुद्धवसंत हा राग हवा तेव्हां गातात, तो नेहमीं शुभप्रद असतो. त्यांत षड्ज स्वर ग्रह, न्यास आहे.

**पवर्जिता रिग्रहांशन्यासा षाडविका स्मृता ।**
**कदाचिदवरोहे सा पयुता गुर्जरी भवेत् ॥**
**दिनस्य प्रथमे यामे गेया सा गानकोविदैः ॥**

**भावार्थः**—गुर्जरी षाडव आहे. तींत ऋषभस्वर ग्रह, अंश न्यास आहे, व पंचम वर्जित आहे. कोणी कोणी अवरोहांत पंचमाचा प्रयोग करितात. हा राग दिवसाचे पहिल्या प्रहरीं पंडितांनीं गावा.

**सग्रहसन्यासयुक्ता ललिता पंचमोज्झिता ।**
**षाडवा प्रथमे यामे गेया सा शोभनप्रदा ॥**

**भावार्थः**—ललिता राग षाडव आहे. त्यांत पंचम वर्जित आहे. षड्ज ग्रह व न्यास आहे. तो पहिले प्रहरीं गाइल्यानें शोभतो. हा राग शुभप्रद मानितात.

**हिंदोलको रिधत्यक्त औडवः सग्रहांशकः।**
**सन्यासः शुभयोगेऽपि सरागः सार्वकालिकः ॥**

**भावार्थः**—हिंदोल राग ओडव आहे व त्यांत रि, ध हे स्वर वार्जित आहेत. षड्ज ग्रह, अंश, न्यास, आहे. हा सदां शुभप्रसंगीं गावा.

**धैवतांशग्रहन्यासो रागो मल्लारिसंज्ञकः।**
**औडवो गनिवर्जोऽसौ प्रभाते गीयते बुधैः ॥**

**भावार्थः**—मल्लारि राग ओडव आहे. त्यांत ग, नि स्वर वर्जित आहेत. तो सकाळीं पंडित गातात.

**रागो धन्यासिसंज्ञोऽसौ बहुशो रिधवर्जितः।**
**गेयः प्रातरसौ तज्ज्ञैः सन्यासांशग्रहौडवः॥**

**भावार्थः**—धन्यासी नांवाच्या रागांत बहुधा रि, ध वर्जित असतात. त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. व तो पंडितांनीं सकाळीं गावा.

**रागो मालवगौळश्च निन्यासांशग्रहो मतः।**
**औडवो रिपवर्जश्च कदाचिद्रिपसंयुतः ॥**

**भावार्थः**—मालवगौड राग ओडव असून त्यांत रि, प वर्जित असतात. त्यांत निषाद स्वर ग्रह, अंश, न्यास, मानिला आहे. कधीं कधीं रि, प हे स्वर घेऊनही कोणी गातात.

**गेयः सायाह्नसमये रागाणामुत्तमोत्तमः ॥**

**भावार्थः**—हा मालवगौड राग सर्व रागांत अति उत्तम आहे व याचा वेळ संध्याकाळचा मानिला आहे.

**श्रीरागः सग्रहः सांशः सन्यासो गधवर्जितः ।**
**औडवोऽपि भवेद्रागः कदाचित् गधसंयुतः ।**
**सायान्हे गीयतामेष सर्वसंपत्प्रदायकः ॥**

**भावार्थः**—श्रीराग ओडव आहे. त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे, व ग, ध हे स्वर वर्जित आहेत. कोणी कोणी ग, ध घेऊन ही हा राग गातात. याचा वेळ संध्याकाळचा असून तो शुभदायक मानिला आहे.

[ टीप. येथपर्यंत ग्रंथकारानें " उत्तम " राग सांगितले. उत्तम राग एकंदर वीस सांगावयाचे होते, परंतु येथें " मालवश्री " राग सांगावयाचा राहिला आहे, असें दिसतें. ]

## मध्यमरागाः १५

---

**केदारगौळः संपूर्णो निन्यासो निग्रहोऽपिच ।**
**निषादांशश्चतुर्थेऽह्नि प्रहरे गीयते बुधैः ॥**

**भावार्थः**—केदारगौळ राग संपूर्ण असून त्यांत निषाद हा स्वर ग्रह, अंश, न्यास आहे. तो दिवसाचे चौथे प्रहरीं पंडित गातात.

**नादरामक्रियारागः षड्जन्यासस्तु सग्रहः ।**
**षड्जांशकस्तु संपूर्णो गेयो यामे तुरीयके ॥**

**भावार्थः**—नादरामक्रिया राग संपूर्ण आहे. त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे व तो दिवसाचे चौथे प्रहरीं गावा.

**सन्यासा सग्रहा सांशा संपूर्णाऽपि क्वचित् क्वचित् ।**
**आरोहे मनिवर्जाऽसौ कांभोजी सायमीरिता ॥**

**भावार्थः**—कांभोजींत षड्ज ग्रह, अंश, न्यास, आहे. आरोहांत म, नि वर्जित आहेत. कोणी कोणी हा राग संपूर्ण मानितात. या रागाचा वेळ संध्याकाळ आहे.

**षड्जांशा संग्रहा षड्जन्यासा सामवराळिका ।**
**संपूर्णा सर्वदा गेया सामवेदसमुद्भवा ॥**

**भावार्थः**--सामवराळी रागांत षड्ज अंश, ग्रह, न्यास, आहे. तो संपूर्ण असून हवा तेव्हां गातात. या रागाची उत्पत्ति सामवेदापासून आहे.

**रीतिगौळो निषादांशो निन्यासग्रह एवच ।**
**संपूर्णो गीयते सायं मुखारीमेलमाश्रितः ॥**

**भावार्थः**—रीतिगौळ रागांत निषाद अंश, ग्रह, न्यास आहे. तो राग संपूर्ण आहे व मुखारी मेलांतून निघाला आहे. त्याचा वेळ सायंकाल आहे.

**हिजूजीरागः संपूर्णो मन्यासो मग्रहांशकः ।**
**गेयोऽह्नः पश्चिमे यामे काकल्यंतरभूषितः ॥**

**भावार्थः**--हिजूजी राग संपूर्ण असून त्यांत मध्यम ग्रह, अंश, न्यास आहे. या रागांत काकली व अंतर स्वर फार सुंदर दिसतात. तो दिवसाचे शेवटल्या प्रहरीं गातात.

**गांशो नारायणीरागो गांधारन्यासकग्रहः ।**
**संपूर्णः प्रातरुद्गेयोऽवरोहे रिच्युतः क्वचित् ॥**

**भावार्थः**—नारायणी राग संपूर्ण आहे व त्यांत गांधार ग्रह, अंश, न्यास, आहे. कोणी अवरोहांत ऋषभ वर्जित करितात. हा राग सकाळीं गावा.

**पूर्णो वेलावलीरागो धन्यासस्तु चधग्रहः ।**
**क्वचिद्रिपाभ्यां न्यूनः स्यादवरोहे प्रभातजः ॥**

**भावार्थः**—वेलावली राग संपूर्ण आहे व त्यांत धैवत न्यास व ग्रह आहे. याचा वेळ सकाळचा आहे. कोणी कोणी अवरोहांत रि, प हे स्वर घेत नाहींत.

( हे आठ संपूर्ण राग " मध्यम " वर्गातले झाले. )

**रागः कन्नडबंगालो गांधारग्रहकांशकः।**
**गन्यासारिषभन्यूनः प्रातर्गेयः स षाडवः॥**

**भावार्थः**—कंनडबंगाल राग षाडव आहे व त्यांत रिषभ वर्जित आहे. गांधार अंश, ग्रह, न्यास आहे. तो सकाळीं गावयाचा आहे.

**पाडीरागस्तु सन्यासः सांशः षड्जग्रहः स्मृतः।**
**तुरीययामे गेयोऽसौ निहीनः षाडवो मतः॥**

**भावार्थः**—पाडी राग षाडव आहे व त्यांत निषाद वर्जित आहे. ( इतर ग्रंथांत ग वर्जित म्हटला आहे. ) षड्जस्वर अंश, ग्रह, न्यास आहे. दिवसाचे चवथे प्रहरीं तो गावा.

**वसंतभैरवीरागः सन्यासः पंचमोज्झितः।**
**सग्रहः षड्जकन्यासः प्रातर्गेयः स षाडवः॥**

**भावार्थः**—वसंतभैरवी रागांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. पंचम वर्जित आहे. तो सकाळीं गातात.

**सांशो गुंडक्रियारागः सग्रहन्यासषाडवः।**
**धवर्जितः पूर्वयामे गेयो धैवतयुक् क्वचित्॥**

**भावार्थः**—गुंडक्रिया रागांत षड्ज ग्रह, न्यास आहे. धैवत वर्जित आहे. तो पहिल्या प्रहरीं गावा. कोणी धैवत वर्ज करीत नाहींत.

( हे मध्यम रागांपैकीं चार " षाडव " झाले. )

**मध्यमादि मंग्रहांशो मन्यासो रिधवर्जितः।**
**औडवः पश्चिमे यामे दिनस्य परिगीयते॥**

**भावार्थः**—मध्यमादि रागांत मध्यम ग्रह, अंश, न्यास, आहे. त्यांत रि, ध वर्ज असून तो ओडव आहे. दिवसाच्या शेवटल्या प्रहरीं गातात,

**भूपालीरागः सन्यासः सांशः सग्रहएवच।**
**मनिलोपादौडवः स्यात् प्रातः कालेच गीयते॥**

**भावार्थः**—भूपालींत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. म, नि वर्जित आहेत. या रागाचा वेळ प्रातःकाल आहे

**रिग्रहो रेवगुप्तिः स्याद्रिन्यासो मनिवर्जितः ।**
**औडवश्चरमे यामे दिवसस्य च गीयते ॥**

**भावार्थः**—रेवगुप्तींत री स्वर ग्रह, न्यास आहे. म, नि वर्जित आहेत. हा राग दिवसाचे शेवटच्या प्रहरीं गातात. तो ओडव आहे.

( हे " मध्यम " रागांपैकीं तीन ओडव प्रकार सांगितले. )

**अथाधमानां रागाणां केषांचिल्लक्ष्म कथ्यते ।**
**सावेरीरागो धन्यासो धांशो धग्रह एवच ॥**
**औडवो गनिलोपेन प्रगे गेयो विचक्षणैः ॥**

**भावार्थः**—आतां कांहीं अधम रागांचीं लक्षणें सांगतों. " सावेरी " राग ओडव आहे. त्यांत ग, नी वर्ज करितात. धैवत अंश. ग्रह, न्यास आहे. तो पंडित सकाळीं गातात.

**घंटारवो धैवतांशो धग्रहन्यास एवच ।**
**गलोपात् षाडवः प्रोक्तः सर्वकाले प्रगीयते ॥**

**भावार्थः**—घंटारव रागांत धैवत अंश, ग्रह, न्यास, आहे. गांधार वर्जित असल्यामुळें तो राग षाडव आहे. तो सदां गावा.

**रागो नागध्वनिः पूर्णः षड्जांशः सग्रहोऽपिच ।**
**षड्जन्यासो गीयतेऽसौ सर्वदा गीतकोविदैः ।**

**भावार्थः**—नागध्वनि राग संपूर्ण आहे. त्यांत षड्ज अंश, ग्रह, न्यास, आहे. तो गायक लोक हवा तेव्हां गातात.

**सन्यासः सग्रहश्चैव सांशः संपूर्ण एवच ।**
**सोमरागः सदा गेयो मंद्रमध्यमभूषितः ॥**

**भावार्थः**—मंद्रमध्यमभूषित " सोमराग " संपूर्ण आहे, व त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास, आहे. तो सदां गावा.

**पंचमांशग्रहन्यास आंदोलीराग ईरितः।**
**निगलोपादौडवोऽयं सर्वकाले प्रगीयते ॥**

**भावार्थः**—आंदोली ( आंधाली ) रागांत ग, नि हे स्वर वर्ज आहेत व तो ओडव आहे. त्यांत पंचम ग्रह, अंश, न्यास, आहे. तो सदां गावा.

**शंकराभरणो रागः संपूर्णः सांशकः स्मृतः।**
**षड्जन्यासग्रहः सोऽयं सामंतच्छायमाश्रितः ॥**

**भावार्थः**—शंकराभरण राग संपूर्ण आहे. त्यांत षड्ज ग्रह अंश न्यास आहे, व त्यांत सामंताची छाया दिसते.

**भिन्नषड्जाख्यरागोऽयं सग्रहः परिकीर्तितः।**
**षड्जन्यासः षाडवोऽयं मलोपाद्गीयते सदा॥**
**एवंप्रकारेणोज्ञेया रागाः शेषा विचक्षणैः।**
**अतिसंकीर्णभावेन नास्माभिर्लक्षिताः क्वचित् ॥**

**भावार्थः**—भिन्नषड्ज रागांत षड्ज स्वर ग्रह, न्यास आहे. या रागांत मध्यम वर्ज करून तो गातात. तो हवा तेव्हां गावा. या प्रमाणें बाकीचे राग समजून घ्यावे. ते फार संकीर्ण असल्यामुळें आम्ही येथें सांगितले नाहींत.

असे हे अधम राग झाले.

**गानोपयोगिनां त्वेतत्प्रबंधानां तु लक्षणम्।**
**रत्नाकरे शार्ङ्गदेवसूरिणा कथितं स्फुटम् ॥**
**गांधर्वमखिलंचापि तत्रैव स्पष्टमीरितम्।**
**तत एवावगंतव्यं तस्मान्नकथितं मया ॥**

**भावार्थः**--गानोपयोगी प्रबंधांचें लक्षण रत्नाकरांत शार्ङ्गदेव पंडितानें स्पष्ट दिलें आहे. गांधर्व गीतप्रपंचही त्यानें सविस्तर सांगितला आहे. हे विषय तेथून वाचकांस घेतां येतील, ह्मणून मीं दिले नाहींत.

**शाकेनेत्रधराधराब्धिधरणीगण्येथसाधारणे।**
**वर्षे श्रावणमासि निर्मलतरे पक्षे दशम्यां तिथौ॥**
**रामामात्यविनिर्मिते स्वरतते संगीतरत्नाकरात्।**
**सोऽयं मेलकलानिधिर्मतिमतामाकल्पमाकल्पताम्॥**

[ टीप. या ग्रंथाची तारीख " श्रावण शुद्ध दशमी, शके १४७२ साधारण संवत्सर, " वरील श्लोकावरून ठरेल. ]

इतिश्रीमदभिनवभारताचार्यवाग्गेयकारतोडरमल्लतिम्मामात्य-
नंदनरामामात्यनिर्मिते स्वरमेलकलानिधौ
रागप्रकरणं पंचमम्
श्रीरस्तु

## रामामात्य पंडिताचे वीस मेल व त्यांचे स्वर.

| मेलनांव | स्वर. |
|---|---|
| १ मुखारी 1 | यांत सर्व स्वर शुद्ध ( दक्षिणेकडे या मेलाला कनकांगी ह्मणतात. ) |
| २ मालवगौड 15 | सा रि म प ध शुद्ध, च्युतमध्यमगांधार, च्युतषड्जनिषाद. ( हिंदुस्थानी भैरव थाट ) |
| ३ श्रीराग 22 | सा, पंचश्रुति रि ध, म प शुद्ध, साधारण ग, कैशिक नि. ( हिंदुस्थानी काफी थाट ) |
| ४ सारंगनाट 29 | सा म प शुद्ध, रि ध पंचश्रुतिक, च्युतमध्यमगांधार च्युतषड्जानिषाद. ( हिंदुस्थानी बिलावल थाट ) |
| ५ हिंदोल 20 | सर्व स्वर श्री मेलाचे, परंतु धैवत शुद्ध, ( ह्मणजे हिंदुस्थानी कोमलध ) ( आसावरी थाट ) |
| ६ शुद्धरामक्रिया 51 | स रि प ध शुद्ध, च्युतमध्यमगांधार, च्युतपंचममध्यम, च्युतषड्जानिषाद. ( हिंदुस्थानी पूर्वी थाट ) |
| ७ देशाक्षी 35 | स म प शुद्ध, षट्श्रुति रि, पंचश्रुति ध, च्युतमध्यमगांधार, च्युतषड्जानिषाद. |
| ८ कंनडगौळ 34 | देशाक्षीचेच बहुतेक स्वर, फक्त कैशिक निषाद. |
| ९ शुद्धनाट 36 | स म प शुद्ध, षट्श्रुति रि ध, च्युतमध्यमगांधार, च्युतषड्जनिषाद. |
| १० आहरी 21 | स म प ध शुद्ध, पंचश्रुति रि, साधारण ग, च्युतषड्जनिषाद. |
| ११ नादरामक्री 9 | स रि म प ध शुद्ध, साधारणगांधार, च्युतषड्जनिषाद. |
| १२ शुद्धवराळी 39 | स रि ग प ध शुद्ध, च्युतषड्जनिषाद, च्युतपंचममध्यम. |

| मेलनांव | स्वर. |
| --- | --- |
| १३ रीतिगौळ | स रि ग म प शुद्ध, पंचश्रुति ध, कैशिक निषाद. |
| १४ वसंतभैरवी | स रि म प ध शुद्ध, च्युतमध्यमगांधार, कैशिक निषाद. |
| १५ केदारगौळ | स म प शुद्ध, पंचश्रुति रि ध, च्युतमध्यमगांधार, च्युतषड्जनिषाद. ( कैशिक नी असावा ) |
| १६ हिजूजी | स रि म प ध शुद्ध, अंतरगांधार, काकली निषाद. |
| १७ सामवराळी | स रि ग म प ध शुद्ध, काकली निषाद. |
| १८ रेवगुप्ति | स रि म प ध नि शुद्ध, अंतरगांधार. |
| १९ सामंत | स म प शुद्ध, रि ध षट्श्रुतिक, अंतरगांधार, काकली निषाद. |
| २० कांभोजी | स म प शुद्ध, अंतरगांधार, काकली निषाद रि ध पंचश्रुतिक. |

## कलानिधींतले मेल व त्यांचे जन्यराग ( लक्ष्यसंगीतांतून).

| | |
|---|---|
| १ मुखारी | १ मुखारी |
| २ मालवगौड | १ मालवगौड २ ललिता ३ बौळी ४ सौराष्ट्र ५ गुर्जरी ६ मेचबौळी ७ फलमंजरी ८ गुंडक्री ९ सिंधुरामक्री १० छायागौळ ११ कुरंजी १२ कंनडबंगाल १३ मंगलकैशिक १४ मलहरी |
| ३ श्रीराग | १ श्रीराग २ भैरवी ३ गौळी ४ धन्यासी ५ शुद्धभैरवी ६ वेलावली ७ मालवश्री ८ शंकराभरण ९ आंधाली १० देवगांधार ११ मध्यमादि |
| ४ सारंगनाट | १ सारंगनाट २ सावेरी ३ सालगभैरवी ४ नटनारायणी ५ शुद्धवसंत ६ पूर्वगौड ७ कुंतलवराळी ८ भिन्नषड्ज ९ नारायणी |
| ५ हिंदोल | १ हिंदोल, २ मार्गहिंदोल, ३ भूपाल |
| ६ शुद्धरामक्रिया | १ शुद्धरामक्रिया, २ बौळी, ३ आर्द्रदेशी ४ दीपक |
| ७ देशाक्षी | १ देशाक्षी |
| ८ कंनडगौळ | १ कंनडगौळ, २ घंटारव, ३ शुद्धबंगाल, ४ छायानाट, ५ तुरुष्क तोडी, ६ नागध्वनि, ७ देवक्रिया |
| ९ शुद्धनाट | १ शुद्धनाट |
| १० अहीरी | १ अहीरी |
| ११ नादरामक्रिया | १ नादरामक्रिया |
| १२ शुद्धवराळी | १ शुद्धवराळी |
| १३ गौळ (रीति) | १ रीतिगौळ |
| १४ वसंतभैरवी | १ वसंतभैरवी, २ सोम |
| १५ केदारगौळ | १ केदारगौड २ नारायणगौड |

| | |
|---|---|
| १६ हेजूजी | १ हेजूजी |
| १७ सामवराळी | १ सामवराळी |
| १८ रेवगुप्ति | १ रेवगुप्ति |
| १९ सामंत | १ सामंत |
| २० कांभोजी | १ कांभोजी |



# स्वरमेलकलानिधिः

## रामामात्यविरचितः

---

स च

भारद्वाजशर्मणा

यथामति परिशोधितः

---

श्रीगणेशयंत्रालये मुद्रयित्वा प्राकाश्यं नीतः

---

सन १९१०



ॐ

## ॥ श्रीगणेशायनमः ॥

# स्वरमेलकलानिधि र्विलिख्यते.

रामामात्यप्रणीतेऽस्मिन् स्वरमेलकलानिधौ ।
उपोद्घातप्रकरणं स्वरप्रकरणं ततः ॥
वीणाप्रकरणं चातो मेलप्रकरणं परम् ।
रागप्रकरणं चेति पंच प्रकरणानि हि ॥
उपोद्घातप्रकरणानंतरं राममंत्रिणा ।
तत्र स्वरप्रकरणे द्वितीये प्रतिपाद्यंते ॥
गीतप्रशंसा गंधर्वगानभेदा स्ततःपरम् ।
स्थानानि श्रुतयः शुद्धाः स्वराश्च विकृता अपि ॥

**भावार्थः**—या रामामात्य पंडितानें लिहिलेल्या स्वरमेलकलानिधींत पांच प्रकरणें आहेत. १ लें उपोद्घात प्रकरण २ रें स्वर प्रकरण ३ रें वीणाप्रकरण ४ थें मेलप्रकरण ५ वें रागप्रकरण. उपोद्घात प्रकरणानंतर येणाऱ्या स्वरप्रकरणांत रामामात्यानें गीतप्रशंसा, गंधर्व व गान भेद, स्थानें, श्रुति, शुद्ध व विकृत स्वर, या विषयांचें निरूपण केलें आहे.

[ या ग्रंथाची जी नकल मिळाली, तींत अशुद्ध स्थलें बरींच दिसलीं. कित्येक ठिकाणीं—पण थोड्या ठिकाणीं-कांहीं श्लोक त्रुटितही दिसले. कोठें संदर्भाच्या धोरणानें कांहीं शब्दही घालावे लागले आहेत. ]

अथ वीणाप्रकरणे तृतीये प्रतिपाद्यते ।
वीणाप्रशंसा वीणाया मेलनप्रक्रिया ततः ॥
प्रमाणकरणं शुद्धविकृतस्वरसंहतेः ॥

**भावार्थः**—तिसऱ्या वीणाप्रकरणांत वीणाप्रशंसा, वीणामेलनप्रक्रिया—म्हणजे वीणेवरील स्वर मिळविण्याची रीति वगैरे,—शुद्ध व विकृत स्वरांचें प्रमाणकरण ( सिद्ध करणें ) यांविषयीं सांगितलें आहे.

शुद्धमेलाख्यवीणादौ मध्यमेलाव्हया ततः ।
तृतीयाच्युतराजेंद्रमेलवीणेति लक्षिता ॥

**भावार्थः**—प्रथमतः शुद्धमेळवीणा सांगितली आहे, तदनंतर मध्यमेलवीणेचें वर्णन केलें आहे. पुढें मग अच्युतराजेंद्रमेलवीणेविषयीं सांगितलें आहे.

[ टीप. या ग्रंथांत आह्मीं वीणाप्रकरण सांगितलें नाहीं. त्याचें उत्तम वर्णन रागविबोधाच्या दुसऱ्या विवेकांत सांपडण्याजोगें आहे. तो ग्रंथ आतां छापलेला आहे. ]

अथमेलप्रकरणे तुरीये प्रतिपाद्यते ।
मेलानां विंशति भेदा रागास्तन्मेलसंभवाः ॥

**भावार्थः**—चवथ्या मेलप्रकरणांत मेलांचे वीस भेद व त्यांतून उत्पन्न होणारे राग, यांचें वर्णन केलें आहे.

उत्तरेतु प्रकरणे पंचमे प्रतिपाद्यंते ।
रागाणांच त्रयो भेदा उत्तमाधममध्यमाः ॥

**भावार्थः**—शेवटच्या पांचव्या प्रकरणांत रागांचे उतम मध्यम व अधम असे तीन भेद सांगितले आहेत.

उत्तमानां मध्यमानां रागाणां लक्षणं ततः ।
अधमानां तु केषांचिदेतावान् वस्तुसंग्रहः ॥

**भावार्थः**—त्यानंतर उत्तम व मध्यम रागांचीं लक्षणें दिलीं आहेत. त्याचप्रमाणें कांहीं अधम रागांचींही लक्षणें सांगितलीं आहेत. असा या ग्रंथाचा वस्तुसंग्रह आहे.

इतिश्रीमदभिनवभरताचार्यवाग्गेयकारतोडरमल्लतिम्मामात्य-
नंदनरामामात्यनिर्मिते स्वरमेलकलानिधौ
उपोद्घातप्रकरणं संपूर्णम्

---

# स्वरप्रकरणम्

सामवेदादिदं गीतं सञ्जग्राह पितामहः ।
गीतेन प्रीयते देवः सर्वज्ञः पार्वतीपतिः ॥ १

**भावार्थः**—ब्रह्मदेवानें सामवेदांतून संगीत उत्पन्न केलें. पार्वतीपति महादेव गीतानें नेहमीं संतुष्ट होत असतो.

गोपीपतिरनंतोऽपि गीतध्वनिवशंगतः ।
सामगीतरतो ब्रह्मा वीणासक्ता सरस्वती ॥ २

**भावार्थः**—गोपीपति जो अनंत तोही गीतध्वनिवश आहे. ब्रह्मदेव सामगीतरत आहे, ह्मणजे त्याला सामगान फारच प्रिय आहे. सरस्वती वीणेवर आसक्त आहे.

किमन्ये यक्षगंधर्वदेवदानवमानवाः । ३

**भावार्थः**—मग इतर जे यक्ष, गंधर्व, देव, दानव, मानव यांची काय कथा ?

अज्ञातविषयास्वादो बालः पर्यंकिकातले ।
रुदन् गीतामृतं पीत्वा हर्षोत्कर्षं प्रपद्यते ॥ ४

**भावार्थः**—ज्याला अजून कोणत्याही प्रकारचा विषयास्वाद घडलेला नाहीं, असा लहान बाल जर बिछान्यांत रडत असला, तर त्याच्या कानीं गीतामृत पडल्याबरोबर तो हर्ष पावतो.

वनेचरस्तृणाहार श्चित्रमृगशिशुः पशुः ।
लुब्धो लुब्धकसंगीते गीते यच्छति जीवितम् ॥ ५

**भावार्थः**—चित्रमृगाचें लहान पोर, हें तर एक जंगलांत फिरणारा व गवत खाणारा पशु आहे, परंतु तेंही पारध्याच्या संगीतावर लुब्ध होऊन आपला प्राण अर्पण करितें.

कृष्णसर्पोऽपि तद्गीतं श्रुत्वा हर्षं प्रपद्यते ।
तस्य गीतस्य माहात्म्यं के प्रशंसितु मीशते ॥ ६

**भावार्थः**—कृष्णसर्प देखील गीत ऐकून हर्ष पावतो. तेव्हां अशा त्या गीताचें माहात्म्य यथायोग्य कोण वर्णू शकतील ?

**गांधर्वस्वरसंदर्भो गीतमित्यभिधीयते ।**
**गांधर्वं गानमित्यस्य भेदद्वयमुदीरितम् ॥**

**भावार्थः**—गांधर्व स्वरसमुदायाला गीत ह्मणतात. गीताचे दोन भेद आहेत. १ ला गांधर्व, २ रा गान.

[ टीप. हा श्लोक रत्नाकरांतून घेतला असावा. तेथें " रंजकःस्वरसंदर्भः " असें ह्मटलें आहे. ]

**अनादिसंप्रदायं यद्गंधर्वैः संप्रयुज्यते ।**
**नियतं श्रेयसो हेतु स्तद्गांधर्वं प्रचक्षते ॥**

**भावार्थः**—जें अनादिसंप्रदाय ( अपौरुषेय ) असून ज्याचा प्रयोग गंधर्व करितात, तें सतत मोक्षहेतुभूत गीत " गांधर्व " होय.

**यत्तु वाग्गेयकारेण रचितं लक्षणान्वितम् ।**
**देशीरागादिभिः प्रोक्तं तद्गानं जनरंजनम् ॥**

**भावार्थः**—जें वाग्गेयकारांनीं ( पंडितांनीं ) निरनिराळ्या लक्षणांनीं रचून तयार केलेलें, ज्यांत देशीरागादिकांचा समावेश होतो, व जें जनरंजक असतें, त्याला " गान " ह्मणतात.

**तत्र लक्ष्मानुरोधेन गांधर्वं संप्रयुज्यते ॥**

**भावार्थः**—गांधर्व गीत सदा लक्षणाला अनुसरूनच असलें पाहिजे, असा नियम आहे.

**यत्र लक्ष्मपरित्यागे प्रत्यवायो न विद्यते ।**
**तस्माल्लक्ष्यप्रधानं तत्तु लक्ष्मप्रधानकम् ॥**
**परित्यागेऽत्र लक्ष्यस्य रंजनं नैव जायते ।**
**तस्माल्लक्ष्मानुरोधेन गानं लोके प्रवर्तते ॥**

**भावार्थः**— ज्या गीतांत अंमळ लक्षणाचा त्याग घडला तरी फारसा दोष नसतो, तें लोकांत " गान " मानिलें आहे. गान हें लक्ष्यप्रधान आहे, लक्षमप्रधान नाहीं. त्यांत लक्ष्याकडे दुर्लक्ष्य झालें, कीं त्यांतला रक्तिगुण कमी होतो. ह्मणूनच " गान " हें सदा लक्ष्याच्या अनुरोधानें असावें, असें मानितात.

**सर्वसंगीतशास्त्रार्थवेदिना शाङ्गसूरिणा ।**
**गीते लक्ष्यप्रधानत्वं वाद्याध्याये निरूपितम् ॥**

**भावार्थः**—सर्व संगीतशास्त्रपारंगत शार्ङ्गदेव पंडितानें आपल्या ( रत्नाकराच्या ) वाद्याध्यायांत गीत नेहमीं लक्ष्यप्रधान आहे, असेंच प्रतिपादन केलें आहे. ( तो असें ह्मणतो ).

**यद्वा लक्ष्यप्रधानानि शास्त्राण्येतानि मन्वते ।**
**तस्माल्लक्ष्यविरुद्धं यत्तच्छास्त्रं नेयमन्यथा ॥**

**भावार्थः**—हीं ( देशी संगीत विषयक ) शास्त्रें लक्ष्यप्रधानच मानिलीं आहेत. ह्मणून जेथें जेथें शास्त्रवाक्य लक्ष्यविरुद्ध होत असेल, तेथें तेथें तें लक्ष्याला बाधक न होईल असें करावें. ( त्याचा अर्थ लक्ष्यसाधक करावा. )

**आत्मा विवक्षमाणोऽयं मनः प्रेरयते मनः ।**
**देहस्थं वन्हिमाहन्ति सप्रेरयति मारुतम् ॥**
**ब्रह्मग्रंथिस्थितः सोऽथ क्रमादूर्ध्वपथे चरन् ।**
**नाभिहृत्कंठमूर्धास्येष्वाविर्भावयते ध्वनिम् ॥**

**भावार्थः**—आत्म्याला भाषण करण्याची इच्छा होऊन तो मनाला प्रेरित करितो. तें मन देहांतील अग्नीला चलन देतें. अग्नि वायूचें चलन करितो. ब्रह्मग्रंथींत वास करणारा वायु क्रमानें मग वर चढत जाऊन नाभि, हृदय, कंठ, मूर्धा, मुख इतक्या स्थानांतून नादाचा आविर्भाव करितो.

नादोऽतिसूक्ष्मः सूक्ष्मश्च पुष्टोऽपुष्टश्च कृत्रिमः ।
इति पंचाभिधां धत्ते पंचस्थानस्थितः क्रमात् ॥ १७

**भावार्थः**—नाद हा पांच स्थानांच्या ठिकाणीं पांच नांवें पावतो. तीं क्रमानें अशीं आहेत. १ अतिसूक्ष्म २ सूक्ष्म ३ पुष्ट ४ अपुष्ट ५ कृत्रिम.

व्यवहारे त्वसौ त्रेधा हृदि मंद्रोऽभिधीयते ।
कंठे मध्यो मूर्ध्नि तारो द्विगुणश्चोत्तरोत्तरः ॥ १८

**भावार्थः**—व्यवहारांत नाद तीनच प्रकारचा मानिला आहे. हृदयांतला नाद तो " मंद्र, " कंठांतला तो " मध्य " व मस्तकांतला तो " तार " जाणावा. हे नाद, एकाहून दुसरा दुप्पट ( उंच ) अशा रीतीनें समजावे.

तस्य द्वाविंशतिर्भेदाः श्रवणात् श्रुतयो मताः ।
हृदभ्यंतरसंलग्ना नाड्यो द्वाविंशतिर्मताः ॥ १९
तिरश्चस्तासु तावत्यः श्रुतयो मारुताहताः ।
उच्चोच्चतरतायुक्ताः प्रभवंत्युत्तरोत्तरम् ॥ २०

**भावार्थः**—नादाचे बावीस भेद मानिले आहेत. ते सारे नाद स्पष्ट श्रवण करितां येतात, ह्मणून त्यांना " श्रुति " ह्मणतात. हृदयस्थानांत एकंदर बावीस नाडी लागलेल्या आहेत. त्या आडव्या आहेत. त्यांतूनच मारुत ह्मणजे वायु याच्या आघातानें बावीस श्रुति, एकीहून दुसरी उंच, अशा तऱ्हेनें उत्पन्न होतात.

एवं कंठे तथा शीर्षे हृदि द्वाविंशति मताः । २१

**भावार्थः**—हृदय, कंठ, व शीर्ष अशीं जीं तीन स्थानें मानिलीं आहेत, त्या प्रत्येक स्थानीं बावीस श्रुति आहेत.

श्रुतिभ्यः स्युः स्वराः षड्जर्षभगांधारमध्यमाः ।
पंचमो धैवतश्चाथ निषाद इति सप्त ते ॥ २२
तेषां संज्ञाः स रि ग म प ध नीत्यपरा मताः ॥ २३

**भावार्थः**--त्या बावीस श्रुतींतून षड्ज, ऋषभ, गांधे, मध्यम, पंचम, धैवत व निषाद, असे सप्त स्वर उत्पन्न होतात. त्यांचीं स, रि, ग, म, प, ध, नी, अशीं दुसरीं ( संक्षिप्त ) नामें आहेत.

**श्रुत्यनंतरभावी यः स्निग्धोऽनुरणनात्मकः ।**
**स्वतो रंजयति श्रोतृचित्तं स स्वर उच्यते ॥** २५

**भावार्थः**--श्रुतीच्या मागून लागलाच उत्पन्न होणारा, अनुरणन ज्याला आहे असा, व ऐकणारांच्या चित्ताचें स्वतः रंजन करूं शकेल असा स्निग्ध जो (नाद), तोच " स्वर." ( कोणी " श्रुत्यभ्यंतर " सुचवितात. )

[टीप-हा श्लोक रत्नाकरांतला आहे. कल्लिनाथ पंडितानें वरील श्लोकांतलीं विशेषणें अशीं समजाविलीं आहेत. " श्रुत्यनंतरभावी=श्रुतेश्च तुर्यादेर्मारुता-द्याहत्युत्पन्नप्रथमध्वनेरनन्तरं भावी; स्निग्धः=मन्दूरश्राव्यः; अनुरणनात्मकः= अनुस्वाररूपः; स्वतः=सहकारिकारणनिरपेक्षम्; "

संगीत दर्पणांत या श्लोकावर अशी टीका आहे. " श्रुतेरनंतरं भवतीति श्रुत्यनन्तरभावी; अनुरणनात्मकः=प्रथमतंत्र्यामाहतायां तद्देशावच्छेदेन यः प्रथमो ध्वनिरुत्पद्यते सा श्रुतिः, यस्तु प्रथमध्वनिव्यापको ध्वनिप्रवाहस्तदनंतरं श्रूयते तदनुरणनं, तदेव आत्मा स्वरूपं यस्य सः; स्निग्धः=श्रोत्राभिरामः ; स्वतः स्वयं, अन्यानपेक्षया; "

श्रुतीविषयीं Capt. Day साहेब ह्मणतात. "The exact definition of what constituted a " Shruti " is difficult to determine, but it is thus vaguely given by the Sangeet Ratnavali:—" A Shruti is formed by the smallest intervals of sound, and is perceivable by the ear; it is of twenty-two kinds; every distinct audible sound is a Shruti; it is a Shruti because it is to be heard by the ear."

"The scales are formed from the Shrutis, four Shrutis being allotted to a major tone, three to a minor (which would appear to have been of a pitch somewhat flatter than the tone and sharper than the semitone; doubts however, exist as to whether the intervals of the Shrutis were equal or not), and two to a semitone (p. 15).

The peculiar division of the octave into twenty-two parts or Shrutis exists no longer in practice and the employment of Shrutis or intervals less than semitones is *limited to grace.*

The ragas in present use in most respects differ from those previously mentioned, and, in fact, the whole system has undergone complete change and gradual refinement, until between the ancient and modern music there exists a difference as clearly marked and perceivable to even the most casual observer, as between the modern Anglican chant and the ancient Gregorian tones."

श्रुतींच्या विषयावर वाचकांनीं राजा सुरेंद्रमोहन टागोर यांचें एक लहानसें पुस्तक "The twenty-two Musical Shrutis of the Hindus." आहे, तें वाचावें. त्या पुस्तकांत संस्कृत ग्रंथांचा शुद्धस्वरमेल "शंकराभरण" (European c Scale) ठरविण्याचा प्रयत्न केलेला आहे, तो मात्र प्राचीनग्रंथसंमत नाहीं, हें ध्यानांत ठेवावें. ]

**सुव्यक्तमेव वीणायामस्यार्थस्य निदर्शनम् ॥ २४**

**भावार्थः**—या अर्थाचें स्पष्टीकरण वीणेवर उत्तम होत असतें.

**तत्र तुर्यश्रुतौ षड्जः सप्तम्यामृषभो मतः ।**
**ततो नवम्यां गांधार स्त्रयोदश्यां तु मध्यमः ॥ २५**
**पंचमः सप्तदश्यां तु धैवतो विंशतिश्रुतौ ।**
**द्वाविंश्यां तु निषादः स्यात् श्रुतिष्वित्थं स्वरोद्भवः ॥ २६**

**भावार्थः—**( रत्नाकरांत सांगितल्याप्रमाणें बावीस श्रुतियुक्त वीणेवर ) चवथ्या श्रुतीवर षड्जस्वर उत्पन्न होतो. सातवीवर ऋषभ, नववीवर गांधार तेरावीवर मध्यम, सतरावीवर पंचम, विसावीवर धैवत, व बाविसावीवर निषाद, या प्रमाणें स्वरांची उत्पत्ति समजून घ्यावी.

**ननु श्रुतिश्चतुर्थ्यादिरस्त्वेवं स्वरकारणम् ।**
**त्र्यादीनां तत्र पूर्वासां श्रुतीनां हेतुता कथम् ॥ २८**

**भावार्थः—**( कोणी शंकाकार विचारतो ) अहो, चवथी, सातवी, नववी इत्यादि प्रत्यक्ष स्वरोत्पादक श्रुतींना स्वरकारण मानितां येईल, परंतु तिसरी, दुसरी वगैरे ज्या पूर्वश्रुति आहेत, त्यांना स्वरांचें कारण कसें मानितां येईल, बरें ?

**ब्रूम स्तुर्यातृतीयादिः श्रुतिः पूर्वाभिकांक्षया ।**
**निर्वार्यतेऽतः श्रुतयः पूर्वा अप्यत्र हेतवः ॥ २९**

**भावार्थः—**सांगतों. स्वर उत्पन्न करणाऱ्या श्रुति, चवथी, तिसरी वगैरे ज्या आहेत, त्या तरी मागल्या श्रुतींच्या अभिकांक्षेनेंच आहेत. ( जर पहिली, दुसरी या नसल्या तर चवथी वगैरे कोठून होतील ? ). यास्तव त्या पूर्वश्रुतींनाही स्वरकारण मानणें योग्य आहे.

**एते षड्जादयः सप्त स्वराः शुद्धाः प्रकीर्तिताः ।**
**विकृताश्चैव सप्तैवेत्येवं सर्वे चतुर्दश ॥ ३०**

**भावार्थः—**या प्रमाणें हे षड्जादिक सात स्वर सांगितले, ते शुद्ध स्वर झाले. विकृत स्वर देखील सातच आहेत; असे एकंदर ( गीतोपयोगी स्वर ) चवदा झाले.

[ टीप. स्वरमेलकलानिधींतल्या सर्व स्वरांचा नकाशा लक्ष्यसंगीतांत स्पष्ट दिलेला आहे. त्या ग्रंथांत स्वरमेलांतल्या स्वरांची हिंदुस्थानी संगीतांतल्या स्वरांशीं स्पष्ट तुलनाही केलेली आहे. ]

**ननु रत्नाकरे शार्ङ्गदेवेन विकृताः स्वराः ।**
**द्वादशोक्ताः कथं तेतु सप्तैव कथितास्त्वया ॥**

**भावार्थः**—( शंकाकार विचारतो ) अहो, शार्ङ्गदेव पंडितानें ( रत्नाकरांत ) विकृत स्वर बारा मानिले आहेत, आणि तुह्मीं ते सातच ह्मणतां, हें कसें ?

[ टीप. ही शंका बरी आहे. रत्नाकरांत शुद्धस्वर सात व विकृत स्वर बारा मानिले आहेत, ही गोष्ट खरी आहे. वाचकांस प्रथमदर्शनीं असें वाटण्याचा संभव असतो कीं, एका सप्तकांत बावीस नाद अथवा श्रुति मानून, त्यांपैकीं शार्ङ्गदेवानें एकोणीस श्रुतींना स्वर मानिले असावे. परंतु वस्तुतः शार्ङ्गदेवाचे स्वर तसे नव्हते. त्याच्या कांहीं विकृत स्वरांच्या जागा शुद्धस्वरांच्या जागांहून निराळ्या मुळींच नव्हत्या. तर मग त्यांना विकृत कां ह्मटले ? या प्रश्नाचें उत्तर आतां रामामात्य देत आहे. ]

**सत्यं लक्षणतो भेदो द्वादशानामपीष्यते ।**
**शुद्धेभ्यस्तत्र भेदस्तु सप्तानामेव लक्षितः ॥**

**भावार्थः**—( तुमची शंका ) यथार्थ आहे. केवळ लक्षणाच्या दृष्टीनें विचार केला, तर विकृत स्वर बारा बरोबर होतील. परंतु ज्यांच्या जागा ( ध्वनीनें ) शुद्धस्वरांच्या जागांहून भिन्न होतील तेच खरे विकृत, अशा दृष्टीनें पाहिलें, तर विकृत, स्वर सातच ठरतील.

[ टीप. लक्ष्यसंगीतांत पृ. १० व १७ वर दिलेले नकाशे पहा. सतरावे पानावर रत्नाकरांतल्या शुद्ध व विकृत स्वरांचा खुलासा केलेला आहे. तेथें अच्युतषड्ज, विकृत रिषभ, अच्युत मध्यम, विकृतपंचम, व विकृत धैवत या विकृत स्वरांचीं स्थानें तपासून पाहावीं ह्मणजे रामामात्याचे बोलण्याचा भाव स्पष्ट समजेल. ]

आधारश्रुतिसंत्यागात् ध्वनिभेदः प्रकीर्तितः ।
पंचानां परिशिष्टानां स्वराणां विकृतात्मनाम् ॥
पूर्वस्वरश्रुतिग्राहात्वा पूर्वश्रुतिवर्जनात् ।
अपिलक्षणतो भेदे पूर्वोक्तस्वरसंहतेः ।
आधारश्रुतिनिष्ठत्वा लक्ष्यभेदो न विद्यते ॥

**भावार्थः**—आधारश्रुति ( जीवर प्रत्येक शुद्धस्वर प्रथम काईम केलेला असतो ती ) स्वरानें सोडली कीं खरा ध्वनिभेद ( विकृत स्वर ) उत्पन्न होतो. ( रत्नाकराचे बारा विकृतांत मी सातच स्वीकारितों कारण ) बाकीच्या पांच विकृत नांवांच्या स्वरांना, मागल्या स्वराची एखादी श्रुति मिळाल्यानें अथवा स्वतःची पूर्वश्रुति सुटल्यानें, लक्षण दृष्टीनें विकृत ह्मणतां येईल, परंतु जेथपर्यंत त्यांच्या आधार श्रुति सुटणार नाहींत, तेथपर्यंत खरें विकृतत्व ( ध्वनिभेद ) मानितां येणार नाहीं.

कथं न भेद इति चेत् सलक्ष्यं तन्निरूप्यते ॥

**भावार्थः**—कां मानितां येणार नाहीं ? असें ह्मणाल, तर प्रत्यक्ष उदाहरणानेंच तें समजावितों. ( नकाशा पहा ).

शुद्धषड्जादच्युतस्तु स षड्जो नैव भिद्यते ।
अच्युतो मध्यमः शुद्धान्मध्यमान्न भिदां भजेत ॥
शुद्धर्षभाच्च विकृतो रिषभो न पृथग्भवेत् ।
विकृतो धैवतः शुद्धाद्धैवतान्नातिरिच्यते ॥
मध्यमश्रुत्युपादाने विकृतः पंचमस्तु यः ।
विकृताच्चैव पंचमान्नभेदं चाश्नुते ध्रुवम् ॥
तस्माच्चतुर्दशस्वेवं पूर्वोक्तेष्वेव पंचकः ।
अंतर्भूतो यतस्तस्मान्न पृथक् कथितो मया ॥

**भावार्थः**—( लक्ष्यसंगीत पृ. १७ वरील नकाशावर तुह्मी नीट पाहिलें तर असें दिसेल कीं ) " अच्युत षड्ज " हा विकृत मानिलेला

स्वर शुद्धषड्जाहून मुळींच निराळा नाहीं. ( दोहोंचा ध्वनि एकच आहे. ) तसेंच, अच्युत मध्यम व शुद्धमध्यम यांतही ध्वनिभेद नाहीं.

विकृत रिषभ स्वर शुद्धाहून निराळा नाहीं, व विकृत धैवतस्वर शुद्ध धैवताहून पृथक् नाहीं.( संगीत दर्पणाचें भाषांतर पहा. )

मध्यमाची ( रिकामी पडलेली ) एक श्रुति घेऊन जो विकृत पंचम ( चतुःश्रुतिक ) होतो, तो विकृतपंचमाहून ( मध्यम ग्रामांत तीन श्रुतींचा पंचम असतो ) भिन्न नाहीं.

या प्रमाणें मीं सांगितलेल्या चवदा स्वरांत ( रत्नाकरांतल्या त्या ) पांच स्वरांचा अंतर्भाव होतो, ह्मणून ते मी निराळे मानीत नाहीं.

**सप्तानां विकृतानां तु सोद्देशं लक्ष्म चक्ष्महे ।**
**च्युतः षड्जश्च्युतोमश्च च्युतः स्यात् पंचमस्तथा ॥**
**स्यात् साधारणगांधारोऽन्तरगांधार एवच ।**
**स्यात् कैशिकनिषादोऽथान्यः काकलीनिषादकः ॥**

**भावार्थः**—आतां त्या सात विकृत स्वरांचीं नांवें व लक्षणें सांगतों. १ च्युतषड्ज २ च्युतमध्यम ३ च्युतपंचम ४ साधारणगांधार ५ अंतरगांधार ६ कैशिकनिषाद ७ काकली निषाद.

[टीप. या रामामात्याच्या विकृत स्वरांची वाचकांस उत्तम कल्पना व्हावी ह्मणून ते स्वर आपल्या प्रचलित हिंदुस्थानी पद्धतींतल्या कोणत्या स्वरांशीं समान होतील, तें सांगतों. साधारण गांधार व कैशिकनिषाद, हे क्रमानें हिंदुस्थानी कोमलगांधार व कोमल निषाद, समजावे. अंतरगांधार व काकली निषाद, हे हिंदुस्थानी तीव्रग व तीव्रनी, होतील. च्युत पंचम हा हिंदुस्थानी तीव्र मध्यम जाणावा. च्युत मध्यम स्वराची जागा अंतरगच्या वर व शुद्धमध्यमाच्या खालीं आहे, ह्मणून त्याला हिंदुस्थानी गायक अतितीव्र ग ह्मणतील. त्याच प्रमाणें च्युतषड्ज स्वराला अतितीव्र निषाद मानितां येईल या " च्युत " स्वरांविषयीं–मुख्यत्वें करून च्युतसा व च्युतमं या स्व-

विषयीं—दोन पक्ष अथवा मतें आहेत. रामामात्यानें त्यांचा उल्लेख पुढें केला आहे. कोणी ह्मणतात कीं च्युतम व अंतरग हे स्वर अगदीं जवळजवळचे—एक श्रुतीच्या अंतरावरचे—असल्यामुळें, ते निराळे मानूं नये; च्युतम हा स्वर अंतर गचा प्रतिनिधि मानून घ्यावा. हें मत रामामात्यालाही पसंत आहे. दुसरे ह्मणतात कीं, हे दोन स्वर निराळे मानूं नये, हें खरें आहे, परंतु अंतरगांधाराला च्युतमचा प्रतिनिधि मानावा. हे पक्षकार असें ही विधान पुढें आणितात कीं, वीणेवर अंतर ग व च्युतम या स्वरांना निरनिराळे पडदे बांधलेले नसतात. या बोलण्यांत मर्म नाहीं, असें नाहीं. आपण हिंदुस्थानी पद्धतींत देखील अतितीव्र ग अथवा अतितीव्र नी असे स्वर वीणेवर बांधीत नाहीं. काकली नी व च्युतसा यां विषयीं निराळें सांगण्याची जरूर नाहीं. ]

हित्वा चतुर्थीं स्वाधारश्रुतिं षड्जो यदा श्रुतिम् ।
तृतीयामाश्रयेदेष च्युतषड्जोऽभिधीयते ॥
एवं लक्षणसाम्येन च्युतमध्यमपंचमौ ।
शुद्धस्य मध्यमस्याथ गांधारः श्रुतिमाश्रितः ॥
स साधारणगांधारोंऽतरगांधार उच्यते ।
यो मध्यमस्य शुद्धस्य श्रुतिद्वयसमाश्रितः ॥

**भावार्थः**—षड्जस्वर जेव्हां आपली चौथी ह्मणजे आधारश्रुति सोडून तिसऱ्या श्रुतीवर येतो, तेव्हां त्याला च्युतषड्ज संज्ञा येते. हेंच लक्षण लावून च्युतमध्यम व च्युतपंचम या स्वरांच्या जागा समजून घ्याव्या. गांधार जेव्हां मध्यमाची पहिली श्रुति घेतो, तेव्हां त्याला साधारण गांधार ह्मणतात. तसेंच, जेव्हां तो शुद्धमच्या दोन श्रुति घेतो, तेव्हां अंतर गांधार होतो.

[ टीप. इतिहास दृष्टीनें रामामात्याचा ग्रंथ रत्नाकराच्या पुष्कळ पुढें पणांस आणून सोडतो. रत्नाकराच्या मूर्छना, ग्राम, जाति यां विषयीं

रामामात्यानें कांहींच सांगितलें नाहीं. नवें संगीत व जुनें संगीत यांत कोठें तरी व कसा तरी संबंध जोडून देण्याचा प्रयत्न त्यानें केलेला एक दोन ठिकाणीं दिसतो, परंतु आपल्या विद्वानांना तो अगदीं असंतोषकारक वाटेल. रामामात्याला रत्नाकर चांगला समजला नाहीं, असेंही जरी कोणीं ह्मटलें, तरी तें वेडगळ होणार नाहीं. षड्ज आपल्या चवथ्या श्रुतीवरून तिसरीवर उतरणारच कां ? या प्रश्नाविषयीं रामामात्य काय ह्मणतो ? एक अक्षरही नाहीं. रत्नाकरांतून त्यानें ही व्याख्या घेतली आहे. षड्जसाधारण प्रसंगीं असा प्रकार घडतो, असें तेथें ह्मटलें आहे, पण तसें कां व कोणत्या रागांत घडतें, हें रामामात्याला समजलेंच नसेल, तर तो त्या विषयीं काय लिहिणार ? असें आहे तरी रत्नाकर समजल्याचा आव कोठें कोठें त्यानें घातला आहे, तो पाहून करमणूक वाटते. रामामात्याचे राग व त्यांचे स्वरमेल समजणें कठिण नाहीं, परंतु रत्नाकराचे रागांशीं त्याच्या रागांचा मेळ बरोबर बसेल कीं नाहीं, हा प्रश्न वादग्रस्तच राहील. ]

**प्रथमां शुद्धषड्जस्य निषादश्चेत् श्रुतिं श्रितः ।**
**स कैशिकनिषादाख्यः कथितो गीतवेदिभिः ॥**
**निषादः शुद्धषड्जस्याश्रयते चेच्छ्रुतिद्वयम् ।**
**स काकलीनिषादः स्यादेवं सप्तापि लक्षिताः ॥**

**भावार्थः**—निषादस्वर जेव्हां षड्जाची पहिली श्रुति घेतो तेव्हां तो कैशिक संज्ञा पावतो. तोच निषाद जेव्हां षड्जाच्या पहिल्या दोन श्रुति घेतो, तेव्हां काकली होतो. या प्रमाणें सातही विकृत स्वरांचीं लक्षणें झालीं.

**चतुर्दशस्वरेष्वेषु वक्ष्ये लक्ष्यानुसारतः ।**
**नामांतराणि केषांचिद् व्यवहारप्रसिद्धये ॥**

**भावार्थः**—आतां, व्यवहार प्रसिद्धीसाठीं, या चवदा स्वरां कांहींना दुसरीं जीं प्रचारांत नांवें आढळतात, तीं सांगतों.

[ टीप. हीं नांवें महत्वाचीं आहेत. पुढें मेल प्रकरणांत यांचा उपयोग रामामात्यानें केलेला आहे. त्यानें या ग्रंथांत एकंदर वीस मेल ( दक्षिणे कडे मेळ ह्मणतात. ) सांगितले आहेत. पहिले पंधरा मेल सांगतांना त्यानें च्युतसंज्ञक स्वरांचा उपयोग केला आहे. शेवटल्या पांचांत काकली व अंतर हीं नांवें वापरलीं आहेत. ध्यानांत ठेवण्याची मुख्य गोष्ट ही आहे कीं, या ग्रंथकारानें सांगितलेल्या संगीतांत प्रत्यक्ष उपयोगी स्वर आपलेच ( हिंदुस्थानी पद्धतींतले ) बारा होते. त्यांचीं नांवें त्या वेळचीं होतीं, हें उघडच आहे. तीं नांवें अजूनही दक्षिण पद्धतींत आपल्या दृष्टीस पडतात. ]

च्युतषड्जस्वरो लक्ष्ये निषादत्वेन कीर्तितः ।
च्युतषड्जनिषादाभिधानं तस्य विधीयते ॥
च्युतस्य मध्यमस्यापि गांधारव्यवहारतः ।
च्युतमध्यमगांधारसंज्ञाऽस्य क्रियते मया ।
च्युतपंचममाचष्टे लोका मध्यमसंज्ञया ।
अस्माभिः कथ्यते सोऽतश्च्युतपंचममध्यमः ॥

**भावार्थः**—च्युतषड्ज स्वराला एक प्रकारचा निषाद मानितात, ह्मणून त्याचें नांव येथें " च्युतषड्जनिषाद " ठेविलें आहे. च्युतमध्यम स्वराला प्रचारांत गांधार मानितात, म्हणून आह्मीं त्याचें नांव " च्युत मध्यमगांधार " ठेविलें आहे. " च्युतपंचमाला " लोक मध्यम समजतात, ह्मणून त्याला आह्मीं " च्युतपंचममध्यम " ह्मणतों.

लक्ष्येऽत्र कुत्रचिच्छुद्धगांधारस्थानमाश्रयन् ।
ऋषभः कीर्त्यतेऽस्माभिः पंचश्रुत्यृषभाव्हयः ॥
स साधारणगांधारस्थानस्थो रिषभो यदि ।
लक्ष्यानुसारतः प्रोक्तस्ततष्षट्श्रुतिरेव सः ॥

**भावार्थः**—प्रचारांत शुद्धगांधाराला ऋषभाचें नांव देण्यांत येतें, म्हणून आम्हीं शुद्धगांधाराला " पंचश्रुति ऋषभ " म्हणतों. साधारणगांधारालाही कधीं ऋषभ मानण्याची वहिवाट आहे, म्हणून लक्ष्यानुरोधानें आम्हीं त्याला " षट्श्रुति रिषभ " म्हणतों.

[ टीप. या स्वरांची आठवण उत्तम राहावी म्हणून हिंदुस्थानी पद्धतींतलीं त्यांचीं नांवें पुनः सांगूं. " च्युतषड्जनिषाद "=तीव्र नी; " च्युतमध्यमगांधार "=तीव्र ग; " च्युतपंचममध्यम "=तीव्र म; शुद्धगांधार=पंचश्रुति री=तीव्र री; साधारण ग=षट्श्रुति रि=कोमल ग; कैशिक नी=षट्श्रुति ध=कोमल नी; शुद्ध नी=पंचश्रुति ध=तीव्र ध. रामामात्याचे शुद्ध रि, शुद्ध ध, हे हिंदुस्थानी पद्धतीचे कोमल रि व कोमल ध आहेत. ]

**अथानुवादः क्रियते क्रमादुक्तस्वरावलेः ।**
**वक्ष्यमाणेऽग्रतो रागमेलने सुखबुद्धये ॥**

**भावार्थः**—आतां आपण जे सारे स्वर मागें पाहून गेलों, त्यांचीं नांवें क्रमानें पुनः सांगूं. त्याच्या योगानें पुढें येणारें रागमेलन प्रकरण सुबोध होईल.

**शुद्धाः सप्तस्वराः शुद्धपूर्वया तत्तदाख्यया ।**
**विज्ञेयाः क्रमशः शुद्धषड्जः शुद्धर्षभस्ततः ॥**
**शुद्धगांधार इत्युक्तः शुद्धमध्यम इत्यपि ।**
**शुद्धपंचम इत्येवं शुद्धधैवत इत्यपि ॥**
**ततः शुद्धनिषादश्च त्येवं सप्तस्वराभिधाः ।**
**विकृताः सप्त कथ्यन्ते च्युतषड्जनिषादकः ॥**
**च्युतमध्यमगांधार श्च्युतपंचममध्यमः ।**
**स साधारणगांधारः स्यात्कैशिकनिषादकः ॥**
**स्यात् कांकलीनिषाद श्चांतरगांधार इत्यपि ।**
**शुद्धगांधारके तत्र पंचश्रुत्यृषभोऽभिधा ॥**

साधारणेऽपि गांधारे षट्श्रुत्यृषभनामच ।
अस्ति कचित् कचिद्रागभेऽने गानसंमतम् ॥
शुद्धनिषादनामान्यत् स्यात् पंचश्रुतिधैवतः ।
स्यात् कैशिकनिषादेऽन्यन्नाम षट्श्रुतिधैवतः ॥
चतुर्दशस्वराश्चैते रागे रागे भवंत्यमी ।
पर्यायेण स्वराःसप्त त्रिस्थानेनाधिकाः कचित् ॥

**भावार्थः**--शुद्धस्वर तर सातच आहेत. त्यांच्या नांवांच्या मागें शुद्ध असें उपपद लावण्यांत येतें, जसें शुद्धषड्ज, शुद्धऋषभ, शुद्ध-गांधार, शुद्धमध्यम, शुद्धपंचम, शुद्धधैवत, शुद्धनिषाद. आतां विकृत सात स्वर सांगतों. १ च्युतषड्जनिषाद २ च्युतमध्यमगांधार ३ च्युतपंचममध्यम ४ साधारणगांधार ५ कैशिकनिषाद ६ काकलीनिषाद ७ अंतरगांधार. शुद्धगांधारालाच पंचश्रुति ऋषभ हेंही नांव आहे. साधारणगांधाराचें दुसरें नांव षट्श्रुति ऋषभ आहे. हीं नांवें कांहीं कांहीं मेलांत वापरलीं जातात. शुद्धनिषादाला पंचश्रुति धैवत असेंही ह्मणतात, व कैशिक निषादाला षट्श्रुति धैवत असेंही ह्मणतात. हे असे चवदा स्वर पर्यायानें निरनिराळ्या रागांत तीन्ही स्थानांत येत असतात. प्रत्येक मेलांत सातांहून अधिक स्वर येत नसतात.

इतिश्रीमदभिनवभरताचार्यवाग्गेयकारतोडरमल्लतिम्मामात्य-
नंदनरामामात्यनिर्मिते स्वरमेलकलानिधौ
स्वरप्रकरणं द्वितीयम्

---

# मेलप्रकरणम्

एवं प्रपंचितं लक्ष्म वीणानां तिसृणामपि ।
अनंतरं प्रवक्ष्यामो रागमेलान् यथाक्रमम् ॥

**भावार्थः**—या प्रमाणें ( शुद्धमेला, मध्यमेला, व अच्युतराजेंद्रमेला अशा ) तीन्ही वीणांचीं लक्षणें सांगून आतां आम्ही क्रमानें रागमेळ सांगतों.

देशभाषाप्रसिद्धेन रागनाम्ना विशोषितान् ।
तत्तद्रागप्रधानत्वान्मेलान् वक्ष्ये क्रमादिमान् ॥

**भावार्थः**— देशभाषाप्रसिद्ध जीं रागनामें आहेत, तींच त्या मेळांना देण्यांत आलीं आहेत, कारण त्या त्या मेळांतल्या जन्यरागांत ते प्रधान राग आहेत. ते मेल क्रमानें असे आहेत.

लक्षणं लक्ष्यते पश्चादुद्देशः क्रियतेऽधुना ।
सर्वेषु रागमेलेषु मुखारिर्मेल आदिमः ॥

**भावार्थः**—सध्यां मेळांचीं नांवें सांगूं. लक्षणें पुढें सांगूं. सर्व रागमेळांत " मुखारी " मेल पहिला मानिला आहे.

ततो मालवगौळस्य मेलः श्रीरागमेलकः ।
सारंगनाटमेलश्च मेलो हिंदोलकस्यच ॥
शुद्धरामक्रियामेलो देशाक्षीमेलकोऽपरः ।
मेलः कन्नडगौळस्य शुद्धनाट्याश्च मेलकः ॥
आहरीमेलकश्चैव नादरामक्रियापरः ।
मेलः शुद्धवराळयाश्च रीतिगौळस्य मेलकः ॥
वसंतभैरवीसंज्ञो मेलकस्तु प्रकीर्तितः ।
केदारगौळमेलश्च हेजुज्जीमेलकस्ततः ॥

मेलः सामवराळ्याश्च रेवगुप्तेश्च मेलकः ।
सामंतनाममेलश्च कांभोजीमेलकस्ततः ॥

**भावार्थः**—२ मालवगौळमेल ३ श्रीरागमेल ४ सारंगनाट ५ हिंदोलमेल ६ शुद्धरामक्रियामेल ७ देशाक्षीमेल ८ कंनडगौळमेल ९ शुद्ध-नाटीमेल १० आहरीमेल ११ नादरामक्रियामेल १२ शुद्धवराळीमेल १३ रीतिगौळ १४ वसंतभैरवी १५ केदारगौळ १६ हेजुज्जीमेल १७ सामवराळीमेल १८ रेवगुप्ति १९ सामंतमेल २० कांभोजीमेल.

[ टीप. हे रामामात्याचे मुख्य जनक थाट झाले. दक्षिण पद्धतींत " ड " अक्षराबद्दल " ळ " पुष्कळ ठिकाणीं दिसेल. ]

मेला विंशतिरेवैते तेषां लक्षणमुच्यते ।

**भावार्थः**—हे वीस मेल झाले. त्यांचीं लक्षणें सांगतों.

शुद्धसप्तस्वरैर्युक्तो मुखारीमेलको भवेत् ।
अस्मिन् मेले मुखारी च ग्रामरागाश्च केचन ।
संमतः शुद्ध इत्येष शार्ङ्गदेवविपश्चितः ॥

**भावार्थः**—मुखारीमेलांत सातही स्वर शुद्ध लागतात. यांतून मुखारी राग व कांहीं कांहीं ग्रामराग निघतात. शार्ङ्गदेव पंडिताचा शुद्धस्वरांचा मेल, तो हाच जाणावा.

[ टीप. हा श्लोक महत्वाचा आहे. हा ग्रंथ दक्षिणेकडचा आहे, व तो सुमारें चारशें वर्षांवरचा आहे, म्हणून रत्नाकराच्या शुद्धथाटाचा यांतला उल्लेख विचार करण्याजोगा आहे. ]

शुद्धाः सरिमपाः शुद्धधैवतश्च ततःपरम् ।
च्युतमध्यमगांधार श्च्युतषड्जनिषादकः ॥
एतैः सप्तस्वरैर्युक्तः संमतो रागवेदिनाम् ।
मेलो मालवगौडस्य रामामात्येन लक्षितः ॥

**भावार्थः**—ज्या मेलांत स रि म प ध, हे स्वर शुद्ध आहेत, च्युत-मध्यमगांधार व च्युतषड्जनिषाद हेही स्वर आहेत, तो पंडितसंमत मेल, रामामात्यानें " मालवगौड " ह्मटला आहे.

[ टीप. हिंदुस्थानी पद्धतींत हा भैरव थाट होईल. रत्नाकराच्या वाद्याध्यायांत याला " तुरुष्कगौड " ह्मटलें आहे. पृ. ५६१ पहा. ]

**अस्मिन्मेले संभवंति ये रागास्तानथब्रुवे ।**
**रागो मालवगौळाख्यो ललिता बौळिका तथा ॥**
**सौराष्ट्री गुर्जरी मेचबौळी च फलमंजरी ।**
**गुंडक्री सिंधुरामक्री छायागौळः कुरंज्यपि ॥**
**रागः कंनडबंगाल स्तथा मंगलकौशिकः ।**
**मलहरीत्यादिकास्ते रागाः केचिद्भवंत्यतः ॥**

**भावार्थः**—या मेलांतून निघणाऱ्या रागांचीं नांवें सांगतों. १ मालवगौड २ ललिता ३ बहुली ४ सौराष्ट्र ५ गुर्जरी ६ मेचबौळी ७ फलमंजरी ८ गुंडक्री ९ सिंधुरामक्री १० छायागौळ ११ कुरंजी १२ कंनडबंगाल १३ मंगलकौशिक १४ मलहरी इ.

**शुद्धषड्जः पंचश्रुतीरिषभश्च तथापरः ।**
**स्यात्साधारणगांधारः शुद्धौ पंचममध्यमौ ॥**
**पंचश्रुति धैवतश्च कैशिक्याख्यनिषादकः ।**
**एतैः सप्तस्वरैर्युक्तः श्रीरागस्यचमेलकः ॥**
**अस्मिन्मेले संभवन्ति ये रागास्तानथब्रुवे ।**
**श्रीरागो भैरवी गौळी धन्यासी शुद्धभैरवी ॥**
**वेलावली मालवश्रीः शंकराभरणोऽपिवा ।**
**आंदोळी देवगांधारी मध्यमादि स्तथापरा ॥**
**एवमाद्याश्च कतिचिद्रागा मेलोद्भवा स्ततः ॥**

**भावार्थः**—श्रीरागमेलाचे स्वर असे आहेत. १ . शुद्धषड्ज २ पंच-श्रुतिक ऋषभ ३ साधारणगांधार ४ शुद्धमध्यम ५ शुद्धपंचम ६ पंच-श्रुतिक धैवत ७ कैशिक निषाद. श्रीरागमेलांतून जे राग निघतात त्यांचीं नांवें अशीं आहेत.

१ श्रीराग २ भैरवी ३ गौळी ४ धन्यासी ५ शुद्धभैरवी ६ वेला-वली ७ मालवश्री ८ शंकराभरण ९ आंदोली ( आंधाली ) १० देव-गांधारी ११ मध्यमादि इ.

[ टीप. हा हिंदुस्थानी संगीतपद्धतींतला काफीथाट होईल. त्या पद्धतींत आतां श्रीराग " पूर्वी " मेलांत गातात. दक्षिणेकडे अझून तो काफी थाटांतच गातात, हें ध्यानांत ठेवावें. साधारण ग व कैशिक नी हे स्वर हिंदुस्थानी कोमल ग व कोमल नी आहेत, हें सांगितलेंच आहे. वेलावली, भैरवी, शंकराभरण, हे रागही रामामात्यानें या थाटांत घातले आहेत, तें ध्यानांत असूं द्यावें. ]

पंचश्रुत्यृषभः शुद्धषड्जमध्यमपंचमाः ।
पंचश्रुतिर्धैवतश्च च्युतषड्जनिषादकः ॥
च्युतमध्यमगांधार एतैः सप्तस्वरैर्युतः ।
सारंगनाटमेलोऽयं रामामात्येन लक्षितः ॥
तन्मेलकसमुद्भूतान् रागान् वक्ष्यामि कांश्चन ।
सारंगनाटः सावेरी तथा सारंगभैरवी ॥
नटनारायणी शुद्धवसंतः पूर्वगौळकः ।
स्यात्कुंतलवराळी सा भिन्नषड्जस्तथैवच ॥
नारायणीत्येवमाद्याः केचिद्रागा भवंत्यतः ॥

**भावार्थः**—रामामात्यानें सांगितलेल्या " सारंगनाट " ( कांहीं सालंकनाट म्हटलें आहे ) मेलांत शुद्धषड्ज, पंचश्रुतिऋषभ,

च्युतमध्यमगांधार, शुद्धमध्यम, शुद्धपंचम, पंचश्रुतिधैवत, च्युतषड्जनिषाद असे स्वर लागतात. या मेलांतून जे जन्यराग निघतात ते सांगतों. १ सारंगनाट २ सावेरी ३ सारंगभैरवी ४ नटनारायणी ५ शुद्धवसंत ६ पूर्वगौळ ७ कुंतलवराळी ८ भिन्नषड्ज, ९ नारायणी इ. हे राग या मेलांतले आहेत.

[ टीप. हा थाट आपल्या हिंदुस्थानी पद्धतींतला " बिलावल " थाट होईल. रागविबोधांत " सालंकनाट " असें नांव आहे. तेथें सालंकनाट मल्लारीमेलांत आहे. मल्लारी मेलाचे स्वर वर सांगितल्या प्रमाणेंच आहेत. रागविबोधकार सोमनाथ च्युतमध्यमगांधार व च्युतषड्जनिषाद या स्वरांना " मृदुम " व " मृदुस " ह्मणतो, व त्याचप्रमाणें पंचश्रुति रि, ध यांना तीव्रतर रि, ध ह्मणतो, हें लक्षांत असूं द्यावें. रामामात्याचा च्युतपंचममध्यम तो सोमनाथाचा मृदुप होईल. ]

श्रीरागमेले यल्लक्ष्म तत्स्या द्धिंदोलमेलके ।
धैवतः शुद्ध एवात्र विशेषोऽयं प्रदर्शितः ॥
कांश्चित्तत्रोद्भवान् रागान् वक्ष्ये लक्षणसंगतान् ।
हिंदोलो मार्गहिंदोलो भूपालादिभिरित्यमी ॥
अन्येच कतिचिद्रागाः संभवंत्यत्र मेलके ॥

**भावार्थः—**जें लक्षण वर श्रीरागमेलाचें सांगितलें आहे, तेंच बहुतेक हिंदोल मेलाचें ह्मणतां येईल, परंतु हिंदोल मेळांतळा धैवत शुद्ध आहे. या मेलांतून जे राग निघतात त्यांच्या लक्षणांसुद्धां ते सांगेन. ते राग असे आहेत. १ हिंदोल, २ मार्गहिंदोल ३ भूपाल व दुसरे कांहीं.

[ टीप. काफीथाटांत धैवत तीव्र आहे, हें आपण जाणतों. या हिंदोल थाटांत तो शुद्ध ठेवावयाचा आहे, ह्मणजे तो हिंदुस्थानी पद्धतींतला कोमल होणार आहे. तसें केल्यानें रामामात्याचा हिंदोलथाट तो हिंदुस्थानी " आसावरी " थाट होणार आहे. ]

शुद्धाःसरिपधाश्चैव च्युतपंचममध्यमः ।
च्युतमध्यमगांधार च्युतषड्जनिषादकः ॥
शुद्धरामक्रियामेलः स्यादेभिस्सप्तभिः स्वरैः ।
अत्रमेले संभवंति ये रागास्तानथ ब्रुवे ॥
शुद्धरामक्रिया बौळी ह्यार्द्रदेशीच दीपकः ।
इत्याद्याः संभवंत्यत्र मेळे रागाश्च केचन ॥

**भावार्थः**—ज्यांत स रि प ध हे स्वर शुद्ध असतात, च्युतपंचमम-ध्यम, च्युतमध्यमगांधार, व च्युतषड्जनिषाद हेही स्वर असतात, तो "शुद्धरामक्रिया" मेळ जाणावा. या मेळांतले राग सांगतों. १ शुद्धरामक्री २ बौळी, ३ आर्द्रदेशी, ४ दीपक इत्यादिक राग या मेळांतून उत्पन्न होतात.

[ टीप. हा मेळ आपला हिंदुस्थानी पद्धतींतला " पूर्वी " मेळ होईल. दीपक या थाटांतला राग आहे, हें ध्यानांत असू द्यावें. ]

षट्श्रुत्यृषभकः शुद्धषड्जमध्यमपंचमाः ।
पंचश्रुतिर्धैवतश्च च्युतषड्जनिषादकः ॥
च्युतमध्यमगांधार श्चेत्येतत्स्वरसंयुतः ।
देशाक्षीमेलकः प्रोक्तो रामामात्येन धीमता ॥
देशाक्षीप्रमुखा रागा भवंत्यत्र क्वचित् क्वचित् ॥

**भावार्थः**—ज्या मेळांत षट्श्रुतिक ऋषभ, षड्जशुद्ध, मध्यम व पंचम शुद्ध, पंचश्रुति धैवत, च्युतषड्जनिषाद, च्युतमध्यमगांधार, असे स्वर लागतात, त्याला रामामात्य पंडित " देशाक्षी " मेळ ह्मणतो. या मेळांतून देशाक्षी प्रभृति राग निघतात.

देशाक्षी रागमेलस्य लक्षणं यदुदाहृतम् ।
मेलः कंनडगौळस्य तस्माद्भेदोऽस्ति कश्चन ॥

कैशिक्याख्यनिषादोऽत्र प्रयोज्यो लक्ष्यवेदिभिः ।
अस्मिंस्तु मेले संजातान् रागांल्लक्षणतो ब्रुवे ॥
एकः कंनडगौळाख्य स्तथा घण्टारवोऽपि च ।
शुद्धबंगालनामाच छायानाटस्ततः परः ॥
तथा तुरुष्कतोडीच नागध्वनिरतः परम् ।
देवक्रिया ह्येवमाद्या रागाः केचिद्भवंत्यतः ॥

**भावार्थः**—देशाक्षी मेलाचें जें लक्षण सांगितलें, तेंच बहुतेक कंनडगौळाचें समजावयाचें आहे, परंतु कंनडगौळांत पंडित कैशिक निषाद वापरतात. या मेलांतून निघणाऱ्या रागांचीं नांवें व लक्षणें सांगेन. १ कंनडगौळ २ घंटारव ३ शुद्धबंगाल ४ छायानट ५ तुरुष्कतोडी ६ नागध्वनि ७ देवक्रिया वगैरे कांहीं राग या मेलांतले आहेत.

शुद्धस्वरास्तु समपाः षट्श्रुत्यृषभधैवतौ ।
च्युतमध्यमगांधार श्च्युतषड्जनिषादकः ॥
स्वरैरमीभिः संयुक्तः शुद्धनाट्याश्चमेलकः ।
शुद्धनाटप्रभृतयो रागा अतो भवंतिच ॥

**भावार्थः**—ज्या मेलांत स, म, प, शुद्ध आहेत, षट्श्रुतिऋषभ आहे, षट्श्रुतिधैवत आहे, तसेंच च्युतमध्यमगांधार व च्युतषड्जनिषाद हेही स्वर आहेत, तो " शुद्धनाट " मेल मानिला आहे. त्या मेलांतून शुद्धनाट वगैरे राग निघतात.

शुद्धाः समपधाश्चैव पंचश्रुत्यृषभस्तथा ।
साधारणोऽपि गांधार श्च्युतषड्जनिषादकः ॥
स्वरैरमीभिः संयुक्त आहरीमेलको भवेत् ।
आहरीप्रमुखारागा भवेयुरिहमेलके ॥

**भावार्थः**—ज्या मेलांत स, म, प, ध हे स्वर शुद्ध असतात, पंचश्रुतिऋषभ, साधारणगांधार, च्युतषड्जनिषाद हेही स्वर असतात, त्या " आहरी " मेल ह्मणतात. त्यांतून आहरी वगैरे राग निघतात.

शुद्धाः समपधा रिश्च च्युतषड्जनिषादकः ।
साधारणोऽथ गांधारः स्वरैरेभिः समन्वितः ॥
नादरामक्रियामेल स्तास्मिन् रागाश्चकेचन ।
नादरामक्रियामुख्याः संभवंति क्वचित् क्वचित् ॥

भावार्थः—ज्या मेलांत स म प ध रि, हे सारे स्वर शुद्ध असतात, साधारणगांधार व च्युतषड्जनिषाद हेही स्वर लागतात, त्याला नादरामक्री मेल ह्मणतात. त्यांतून नादरामक्रिया वगैरे राग उत्पन्न होतात.

शुद्धाः सरिपधा यत्र शुद्धगांधारसंज्ञितः ।
च्युतषड्जनिषादोऽपि च्युतपंचममध्यमः ॥
मेलः शुद्धवराळ्याश्च तत्र शुद्धवराळिका ।
अन्येच संभविष्यन्ति रागा देशविभेदतः ॥

भावार्थः—ज्या मेलांत स, रि, प, ध ग हे स्वर शुद्ध असतात, च्युतषड्जनिषाद व च्युतपंचममध्यम हेही स्वर असतात, त्याला "शुद्धवराळी" मेल ह्मणतात. या मेलांतून शुद्धवराळी व कांहीं देशीरागांची उत्पत्ति सांगितली आहे.

शुद्धाः सरिगमाः पश्च पंचश्रुतिकधैवतः ।
कैशिक्याख्यनिषादश्चेत्येतै र्युक्तः स्वरैस्तु यः ॥
स रीतिगौळमेलः स्याद्रीतिगौळादयोऽत्र च ।
रागाः केचिद्भवंतीति संमतं गानवेदिनाम् ॥

भावार्थः—ज्यांत स रि ग म प हे स्वर शुद्ध असतात, पंचश्रुतिक धैवत व कैशिक निषाद हेही स्वर असतात, त्याला "रीतिगौळ" मेल हें नांव दिलें आहे. या मेलांतून रीतिगौळ वगैरे राग निघतात, असें पंडितांचें मत आहे.

च्युतमध्यमगांधारः कैशिक्याख्यनिषादकः ।
शुद्धाःसरिमपा धश्च स्वरैरेभिः समन्वितः ॥

वसंतभैरवीमेल स्तस्मिन् रागाश्च केचन ।
वसंतभैरवीसोमरागप्रभृतयो मताः ॥

**भावार्थः**—ज्यांत स रि म प ध, हे स्वर शुद्ध असतात, च्युतमध्यमगांधार व कैशिक निषाद हेही स्वर येतात, तो वसंतभैरवी मेल जाणावा. त्या मेलांतून वसंतभैरवी, सोम, वगैरे राग उत्पन्न होतात.

शुद्धाश्च समपाः पंचश्रुती चर्षभधैवतौ ।
च्युतमध्यमगांधारश्च्युतषड्जनिषादकः ॥
केदारगौळमेलः स्यात् स्वरैरेभिः समन्वितः ।
तस्मिन् केदारगौळश्च स्यान्नारायणगौळकः ॥
एवमाद्याः संभवंति मेले रागाः क्वचित् क्वचित् ॥

**भावार्थः**—ज्यांत स म प शुद्ध आहेत, पंचश्रुतिक रि ध आहेत, च्युतमध्यमगांधार व च्युतषड्जनिषाद हेही स्वर आहेत, तो केदारगौळ मेल जाणावा. त्यांतून केदारगौळ, नारायणगौळ वगैरे कांहीं कांहीं राग उत्पन्न होतात.

मेलाः पंचदश प्रोक्ताः काकल्यंतरवर्जिताः ।
काकल्यंतरसंयुक्तान् पंचमेलान् प्रचक्ष्महे ॥

**भावार्थः**—असे हे पंधरा मेल आम्हीं सांगितले. त्यांत काकली व अंतर स्वर नव्हते. आतां ते दोन स्वर ज्यांत आहेत, असे मेल सांगतों.

शुद्धौ च षड्जरिषभौ शुद्धाश्चमपधास्तथा ।
गांधारोऽतरसंज्ञश्च काकल्याख्यनिषादकः ॥
एतावत्स्वरसंयुक्तो हिजूजीमेलको भवेत् ।
हिजूज्याद्या भवंत्यत्र ग्रामरागाश्च केचन ॥
इत्येव शार्ङ्गदेवस्य संमतो मार्गवेदिनः ॥

**भावार्थः**—ज्यांत स रि म प ध, हे स्वर शुद्ध असतात, अंत धार व काकलीनिषाद हेही ज्यांत असतात, तो हिजूजी मेल म्हटला

या मेलांतून हिजूर्जा, व कांहीं ग्रामराग उत्पन्न होतात. मार्गसंगीतनिष्णात शार्ङ्गदेवाचा हेजूजी मेल हाच समजावा.

[ टीप. हा श्लोक महत्वाचा मानतात. त्यांत रत्नाकरांतील हेजूजी रागाच्या स्वरूपाचा उल्लेख रामामात्यानें केला आहे. त्यानें आपल्या विधानाला आधार अथवा पुरावा कांहींच दिलेला नाहीं, ही दिलगिरीची गोष्ट आहे, परंतु तेथें आतां कोणाचा इलाज आहे ? या उल्लेखावरून त्या ग्रंथकाराच्या वेळीं रत्नाकराच्या हेजूजीचे स्वरूपाविषयीं काय प्रचारांत समजूत होती, इतकेंच समजेल. रामामात्यानंतर थोडेच वर्षांनीं व्यंकट-मखी पंडित झाला. त्यानें रामामात्याच्या मेलांवर फार कडक टीका केली आहे. ]

शुद्धाः सारिगमाश्चाथ शुद्धौ पंचमधैवतौ ।
निषादः काकलीसंज्ञो ह्येतैः सप्तस्वरैर्युतः ॥
मेलः सामवराळ्याख्य स्तास्मिन् सामवराळिका ।
अन्येच संभविष्यंति रागा इति विदां मतम् ॥

**भावार्थः**—ज्यांत स रि ग म प ध, हे स्वर शुद्ध आहेत, व ज्यांत निषाद काकली आहे, तो " सामवराळी " मेल म्हटला आहे. त्यांतून सामवराळी वगैरे राग निघतात, असें पंडित म्हणतात.

शुद्धाः सारिमपाः शुद्धधनी गांधारकोऽतरः ।
एतैः सप्तस्वरै रेवगुप्तिमेल उदाहृतः ॥
तस्मिन् रागो रेवगुप्तिः शुद्धरागाश्च केचन ।
रत्नाकरीयमेलोत्थाः शार्ङ्गदेवेन लक्षिताः ॥

**भावार्थः**—ज्यांत स रि म प ध नि, हे स्वर शुद्ध असतात, व ज्यांत गांधार अंतर नांवाचा आहे, तो " रेवगुप्ति " मेल मानावा. यांतून रेवगुप्ति राग व शार्ङ्गदेवाच्या रत्नाकरांतले कांहीं कांहीं राग निघतात.

**रिधौ षट्श्रुतिकौचैव काकल्यंतरनामकौ ।**
**शुद्धाः षड्जमपा एतैः स्वरैर्युक्तोभवेद्यदा ॥**
**तदा सामंतमेलः स्यात् तत्र रागास्तदादयः ॥**

**भावार्थः**—ज्यांत स म प, हे शुद्ध आहेत, रि, ध षट्श्रुतिक आहेत, काकली व अंतर स्वरही आहेत, तो " सामंत " मेल ह्मटला आहे. त्यांतून सामंतादिक राग उत्पन्न होतात.

**गनीचांतरकाकल्यौ रिधौ पंचश्रुती तथा ।**
**शुद्धास्तुसमपाश्चैव ह्येतैः कांभोजिमेलकः ॥**
**कांभोजीप्रमुखा रागा मेलऽस्मिन् संभवंतिहि ॥**

**भावार्थः**—कांभोजी मेलांत स म प, शुद्ध आहेत, गांधार व निषाद अंतर व काकली आहेत, रिषभ व धैवत पंचश्रुतिक आहेत; या मेलांतून कांभोजी वगैरे राग निघतात.

**लक्षिता विंशतिर्मेला गात्रे स्युर्नियता अमी ।**
**पक्षद्वयं तु वीणायां वक्ष्यते लक्ष्यसंमतम् ॥**

**भावार्थः**—असे हे गळ्यानें गातां येणारे वीस मेल सांगितले. प्रचारांत वैणिकांत दोन पक्ष आहेत, तेही सांगतों.

**ग्राहादंतरकाकल्योः स्वररूपे पृथक् पृथक् ।**
**पक्षोऽयं प्रथमस्तत्र मेलाः स्युर्विंशति ध्रुवम् ॥**

**भावार्थः**—अंतर व काकली हे दोन स्वर ( च्युत ग व च्युत नी या स्वरांहून ) निराळे प्रत्यक्ष संगीतांत मानल्यानें, एकंदर मेल वीस होतात. हा पहिला पक्ष आहे.

**अंतरस्य च काकल्याः स्थाने प्रतिनिधिः क्रमात् ।**
**च्युतमध्यमगांधार श्च्युतषड्जनिषादकः ॥**
**अयंद्वितीयः पक्षोऽत्रमेलाः पंचदश स्मृताः ॥**

**भावार्थः**—दुसरा पक्ष असें ह्मणतो कीं, अंतर व काकली हे स्वर निराळे न मानितां, च्युतमध्यमगांधार व च्युतषड्जनिषाद या स्वरांतच त्यांचा अंतर्भाव समजून घ्यावा. अशा दृष्टीनें पाहिलें ह्मणजे, ( रामामात्याचे शेवटचे पांच मेल निराळे मानण्याची जरूर न पडून ) मेल १५ च होतील.

[ टीप. रामामात्यालाही हें अंतर्भाव—तत्व पसंत होतें. त्यानें आपल्या मताला दृढ करण्याकरितां शार्ङ्गदेवाच्या " साधारण प्रकरणांतल्या एक दोन श्लोकांचा आधार घेतला आहे. तो ह्मणतो.

" एतदेवाभिसंधाय कथितं शार्ङ्गसूरिणा ।
अल्पप्रयोगः सर्वत्र काकली चांतरस्वरः ॥ "

शार्ङ्गदेवानें अंतर व काकली या स्वरांचा उपयोग स्वतः रागाध्यायांत ठिकठिकाणीं केलेला आहे, हें मात्र येथें सांगितलें पाहिजे. रामामात्यानें रत्नाकरांतील श्लोकांचा अर्थ बरोबर केला आहे कीं काय, हा प्रश्न निराळाच आहे. सध्यां आपण " स्वरमेलकलानिधीचा " खुलासा करीत आहों. प्रत्येक संस्कृतभाषा पंडिताला प्राचीन संस्कृत ग्रंथांतला संगीत विषय देखील उत्तम समजलाच पाहिजे असा नियम आपण कोठें मानण्यास तयार असतों ? असो. ]

**अत्र प्रतिनिधेः पक्षे मुखारीमेलपूर्वकाः ।**
**केदारगौळमेलान्ता मेलाः पंचदश स्मृताः ॥**

**भावार्थः**—( ह्मणून ) येथें प्रतिनिधि पक्षाप्रमाणें " मुखारी " पासून " केदारगौळ " पर्यंत पंधराच मेल सांगितले आहेत.

इतिश्रीमदभिनवभरताचार्यवाग्गेयकारतोडरमलतिम्मामात्य-
नंदनरामामात्यनिर्मितस्वरमेलकलानिधौ
मेलप्रकरणं चतुर्थम्

---

# रागप्रकरणम्

एतेषु वा मता रागा उत्तमा मध्यमा अपि ।
अधमाश्चापि सकलाः कथ्यंते ते विवेकतः ॥

**भावार्थः**—त्या मीं सांगितलेल्या मेलांतून जे जन्य राग निघतात, त्यांचे उत्तम, मध्यम, व अधम, असे तीन वर्ग मानिले आहेत. ते राग आतां सविस्तर सांगितले जातील.

मुखारी शुद्धनाटीच तथा मालवरागकः ।
ततः शुद्धवराळीच गुर्जरी ललितस्तथा ॥
शुद्धरामक्रियाशुद्धवसंतौ भैरवी तथा ।
हिंदोलरागश्रीरागौ रागः कन्नडगौळकः ॥
सामंतरागो देशाक्षी धन्यासी बौळिकेतिच ।
आहरीचापि मल्लारी मालवश्री स्ततःपरम् ॥
सारंगनाटीतिरागाः कथिताश्चोत्तमोत्तमाः ।
असंकीर्णतया लोके रागा विंशतिरेवच ॥
गीतप्रबंधकालापयोग्या एते भवंति हि ॥

**भावार्थः**—मुखारी २ शुद्धनाटी ३ मालव ४ शुद्धवराळी ५ गुर्जरी ६ ललित ७ शुद्धरामक्रिया ८ शुद्धवसंत ९ भैरवी १० हिंदोल ११ श्रीराग १२ कंनडगौळ १३ सामंत १४ देशाक्षी १५ धन्यासी १६ बौळी १७ आहरी १८ मल्लारी १९ मालवश्री २० सारंगनाटी.

हे वीस राग " उत्तम " या वर्गांत घातले आहेत. हे सारे संकीर्ण नसून गीत, प्रबंध, आलाप वगैरे गाण्यास योग्य मानिले आहेत.

[ टीप. " रागविबोध " या नांवाचा सोमनाथ पंडिताचा ग्रंथ आतां छापून प्रसिद्ध झाला आहे. त्या ग्रंथाच्या चवथ्या विवेकांत पृ. ५ वर जी टीका आहे, तींत रामामात्याचें हें वर्गीकरण दिलेलें आहे. तेथें दिलेले उत्तम, मध्यम, अधम राग हुबेहूब रामामात्याचेच क्रमानें सांगितले आहेत. ]

**केदारगौळः कांभोजी बंगालः कन्नडाव्हयः ।**
**वेलाख्या मध्यमादि नारायणी रीतिगौळकः ॥**
**नादरामक्रिया पाडि भूपाली रेवगुप्तिकः ।**
**गुंडक्रिया हिजूजीच वसंतादिश्च भैरवी ॥**
**रागः सामवराळिश्चेत्येते पंचदशैव च ।**
**लोकेऽबहुव्यवहाराः कीर्तिता मध्यमा बुधैः ॥**

**भावार्थः**—केदारगौळ, कांभोजी, बंगाल ( कंनडबंगाल ) वेलावली, मध्यमादि, नारायणी, रीतिगौड, नादरामक्रिया, पाडी, भूपाली, रेवगुप्ति, गुंडक्रिया, हिजूजी, वसंतभैरवी, सामवराळी, असे हे पंधरा राग, पंडितांनीं " मध्यम " या वर्गांत मानिले आहेत. ( हे राग आलापादिकांना योग्य असूनही ) ते, लोकांत फारसे प्रचलित नसल्यामुळें, त्या वर्गांत घातले गेले आहेत.

**सौराष्ट्रो मेचबौळीच छायागौळः कुरंजिका ।**
**सिंधुरामक्रिया गौडी देशी मंगलकौशिकः ॥**
**पूर्वगौळ स्सोमराग आंधाली फलमंजरी ।**
**शंकराभरणो देवगांधारी दीपकस्तथा ॥**
**नटनारायणी शुद्धभैरवी भिन्नषड्जकः ।**
**स्यात् कुंतलवराळीच रागः सारंगभैरवी ॥**
**शुद्धबंगालको नागध्वनि र्घंटारवस्तथा ।**
**मार्गहिंदोलक श्छायानाटी देवक्रियापिच ॥**

नारायणी गौळराग स्ततस्तोडी वराळिका ।
तुरुष्कतोडीरागश्च रागः सावेरिका तथा ॥
आर्द्रदेशीत्यादयश्च रागाः स्युरधमाः क्रमात् ॥
सर्वेष्वेतत्पुरोक्तेषु मध्यमेषूत्तमेषुच ।
अंतर्भूताश्च संकीर्णाः पामरभ्रामकाश्चते ॥
रागास्तावत् प्रबंधानामयोग्या बहुलाश्चते ॥
तस्मान्नते परिग्राह्या रागाः संगीतकोविदैः ॥

**भावार्थः**—पुढील राग " अधम " मानिले आहेत. १ सौराष्ट्र २ मेचबौळी ३ छायागौळ ४ कुरंजी ५ सिंधुरामक्रिया ६ गौडी ७ देशी ८ मंगलकौशिक ९ पूर्वगौड १० सोमराग ११ आंधाली १२ फलमंजरी १३ शंकराभरण १४ देवगांधारी १५ दीपक १६ नटनारायणी १७ शुद्धभैरवी १८ भिन्नषड्ज १९ कुंतलवराळी २० सारंगभैरवी २१ शुद्धबंगाल २२ नागध्वनि २३ घंटारव २४ मार्गहिंदोल २५ छायानाटी २६ देवक्रिया २७ नारायणी २८ गौळराग २९ तोडी ३० वराळी ३१ तुरुष्कतोडी ३२ सावेरी ३३ आर्द्रदेशी ३४ इ. हे सारे राग " अधम " मानिले आहेत. वर जे " उत्तम, मध्यम, व अधम " राग सांगितले, त्यांतच पामरांना ( साधारण लोकांना ) भ्रमांत पाडणारे असे जे संकीर्णराग, त्यांचाही समावेश होतो. प्रबंधादिकांना अयोग्य असे राग तर असंख्यच आहेत, ह्मणून त्यांचा विचार संगीत पंडित बहुधा करीत नाहींत. त्यांचें सविस्तर निरूपण दुःसाध्यही आहे.

देशीरागाश्च सकलाः षड्जग्रामसमुद्भवाः ।
ग्रहांशन्यासमंद्रादिषाडवौडवपूर्णताः ॥
देशीत्वात्सर्वरागेषु भवंति न भवंति वा ।
तथापि लक्ष्यमाश्रित्य लक्ष्यज्ञाननुसृत्यच ॥

विंशत्युत्तमरागाणा मसंकीर्णस्वरूपिणाम् ।
मध्यमानां तथा पंचदशानां च ततः परम् ॥
अधमानां च केषांचिल्लक्षणं लक्ष्यतेऽधुना ॥

**भावार्थः**—सर्व देशीराग षड्जग्रामांतूनच उत्पन्न होत असतात, यास्तव त्यांत ग्रह, अंश, न्यास, मंद्र, षाडवत्व, ओडवत्व, संपूर्णत्व वगैरे प्राचीन ग्रंथोक्त रागलक्षणें यथाशास्त्र दृष्टीस पडतीलच असा नियम नाहीं. तथापि लक्ष्य व लक्ष्यज्ञ यांना अनुसरून, उत्तम मानिलेले असंकीर्ण वीस राग, "मध्यम" वर्गातले पंधरा राग, व "अधम" या वर्गातले कांहीं राग, इतक्यांचीं लक्षणें आम्ही आतां सांगणार आहों.

संपूर्णस्वरसंयुक्तः षड्जन्यासग्रहांशकः ।
यो गेयः पश्चिमे यामे नाटीरागः स उच्यते ॥

**भावार्थः**—नाट रागांत ग्रह, अंश, न्यास षड्ज आहे, तो राग संपूर्ण असून शेवटल्या प्रहरीं गावयाचा आहे.

षड्जांशा सग्रहा षड्जन्यासा संपूर्णतांगता ।
सर्वयामेषु या गेया सा वराळीतिकीर्तिता ॥

**भावार्थः**—वराळींत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे, व ती संपूर्ण आहे. ती हव्या त्या प्रहरीं गातां येते.

सारंगनाटी संपूर्णा सन्यासा सग्रहापिच ।
षड्जांशा पश्चिमे यामे गातव्या कथिता बुधैः ॥

**भावार्थः**—सारंगनाट संपूर्ण आहे, व त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. तो शेवटल्या प्रहरीं गावा असें पंडित ह्मणतात.

शुद्धरामक्रियारागः संपूर्णः सग्रहोऽपिच ।
षड्जांशन्यासंसंयुक्तो गेयो मध्यंदिनात्परम् ॥

**भावार्थः**—शुद्धरामक्रियाराग संपूर्ण आहे. त्यांत षड्ज ग्रह अंश, आहे. तो दोन प्रहरांनंतर गावा.

सग्रहा सांशिका षड्जन्यासा संपूर्णतां गता ।
मुखारी सर्वकालेषु गानयोग्या प्रकीर्तिता ॥

**भावार्थः**--मुखारींत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. तो राग संपूर्ण असून हवा तेव्हां गातां येतो.

संपूर्णो भैरवीरागः सन्यासः सांशको मतः ।
षड्जग्रहस्तथा गेयो यामे यः पश्चिमे च सः ॥

**भावार्थः**—भैरवीराग संपूर्ण आहे. त्यांत ग्रह, अंश, न्यास षड्ज आहे. तो शेवटल्या प्रहरीं गातात.

सन्यास आहरीरागः सांशः षड्जग्रहोऽपिच ।
संपूर्ण श्चरमे यामे गातव्योऽसौ विचक्षणैः ॥

**भावार्थः**--आहरी राग संपूर्ण आहे. त्यांत षड्ज ग्रह अंश, न्यास आहे. तो शेवटल्या प्रहरीं पंडित गातात.

सामंतरागः षड्जांशः षड्जन्यासश्च सग्रहः ।
दिनस्य चरमे यामे गेयः संपूर्णतायुतः ॥

**भावार्थः**—सामंत राग संपूर्ण आहे, व त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. तो संध्याकाळीं गावा.

निधांशकग्रहोपेतो रागः कन्नडगौळकः ।
संपूर्णोऽपि कदाचित् स्यादारोहे त्यक्तमध्यमः ॥
गेयोह्नः पश्चिमे यामे उत्कलानामतिप्रियः ॥

**भावार्थः**—कन्नडगौळ रागांत निषाद व धैवत अंश व ग्रह आहेत; तो संपूर्ण आहे. कोणी आरोहांत मध्यम वर्ज करितात. तो शेवटल्या प्रहरीं गावा. हा राग उत्कलांना ( ओरिसा प्रांतांतील लोकांना ) ग प्रिय आहे.

**सन्यासः सग्रहः पूर्णो देशाक्षीराग उच्यते।**
**आरोहे मनिवर्जोऽसौ पूर्वयामे च गीयते॥**

**भावार्थः**—देशाक्षीराग संपूर्ण आहे व त्यांत षड्ज ग्रह व न्यास आहे. आरोहांत म, नि वर्जित करण्यांत येतात. तो पहिल्या प्रहरीं गातात.

**मध्यमांशग्रहन्यासा पंचमेनविवार्जिता।**
**बौळिका स्यात् षाडवा सा गातव्या पूर्वयामके॥**

**भावार्थः**—बौळिका राग षाडव आहे. त्यांत पंचम वर्जित आहे व तो पहिल्या प्रहरीं गावा.

[ टीप. इतर ग्रंथांत या रागांत "मध्यम" वर्ज करण्याचा स्वर म्हटला आहे. ]

**रागः शुद्धबसंताख्यः सन्यासः सग्रहोऽपिच।**
**गीयते सर्वयामेषु सर्वदा मंगलप्रदः॥**

**भावार्थः**—शुद्धवसंत हा राग हवा तेव्हां गातात, तो नेहमीं शुभप्रद असतो. त्यांत षड्ज स्वर ग्रह, न्यास आहे.

**पवर्जिता रिग्रहांशन्यासा षाडविका स्मृता।**
**कदाचिदवरोहे सा पयुता गुर्जरी भवेत्॥**
**दिनस्य प्रथमे यामे गेया सा गानकोविदैः॥**

**भावार्थः**—गुर्जरी षाडव आहे. तींत ऋषभस्वर ग्रह, अंश न्यास आहे, व पंचम वर्जित आहे. कोणी कोणी अवरोहांत पंचमाचा प्रयोग करितात. हा राग दिवसाचे पहिल्या प्रहरीं पंडितांनीं गावा.

**सग्रहसन्यासयुक्ता ललिता पंचमोज्झिता।**
**षाडवा प्रथमे यामे गेया सा शोभनप्रदा॥**

**भावार्थः**—ललिता राग षाडव आहे. त्यांत पंचम वर्जित आहे. षड्ज ग्रह व न्यास आहे. तो पहिले प्रहरीं गाइल्यानें शोभतो. हा राग शुभप्रद मानितात.

**हिंदोलको रिधत्यक्त औडवः सग्रहांशकः ।**
**सन्यासः शुभयोगेऽपि सरागः सार्वकालिकः ॥**

**भावार्थः**—हिंदोल राग ओडव आहे व त्यांत रि, ध हे स्वर वर्जित आहेत. षड्ज ग्रह, अंश, न्यास, आहे. हा सदां शुभप्रसंगीं गावा.

**धैवतांशग्रहन्यासो रागो मल्लारिसंज्ञकः ।**
**औडवो गनिवर्जोऽसौ प्रभाते गीयते बुधैः ॥**

**भावार्थः**—मल्लारि राग ओडव आहे. त्यांत ग, नि स्वर वर्जित आहेत. तो सकाळीं पंडित गातात.

**रागो धन्यासिसंज्ञोऽसौ बहुशो रिधवर्जितः ।**
**गेयः प्रातरसौ तज्ज्ञैः सन्यासांशग्रहौडवः ॥**

**भावार्थः**—धन्यासी नांवाच्या रागांत बहुधा रि, ध वर्जित असतात. त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. व तो पंडितांनीं सकाळीं गावा.

**रागो मालवगौळश्च निन्यासांशग्रहो मतः ।**
**औडवो रिपवर्जश्च कदाचिद्रिपसंयुतः ॥**

**भावार्थः**—मालवगौड राग ओडव असून त्यांत रि, प वर्जित असतात. त्यांत निषाद स्वर ग्रह, अंश, न्यास, मानिला आहे. कधीं कधीं रि, प हे स्वर घेऊनही कोणी गातात.

**गेयः सायाह्नसमये रागाणामुत्तमोत्तमः ॥**

**भावार्थः**—हा मालवगौड राग सर्व रागांत अति उत्तम आहे याचा वेळ संध्याकाळचा मानिला आहे.

**श्रीरागः सग्रहः सांशः सन्यासो गधवर्जितः।**
**औडवोऽपि भवेद्रागः कदाचित् गधसंयुतः।**
**सायान्हे गीयतामेष सर्वसंपत्प्रदायकः॥**

**भावार्थः**—श्रीराग ओडव आहे. त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे, व ग, ध हे स्वर वर्जित आहेत. कोणी कोणी ग, ध घेऊन ही हा राग गातात. याचा वेळ संध्याकाळचा असून तो शुभदायक मानिला आहे.

[ टीप. येथपर्यंत ग्रंथकारानें " उत्तम " राग सांगितले. उत्तम राग एकंदर वीस सांगावयाचे होते, परंतु येथें " मालवश्री " राग सांगावयाचा राहिला आहे, असें दिसतें. ]

## मध्यमरागाः १५

---

**केदारगौळः संपूर्णो निन्यासो निग्रहोऽपिच।**
**निषादांशश्चतुर्थेऽह्नि प्रहरे गीयते बुधैः॥**

**भावार्थः**—केदारगौळ राग संपूर्ण असून त्यांत निषाद हा स्वर ग्रह, अंश, न्यास आहे. तो दिवसाचे चौथे प्रहरीं पंडित गातात.

**नादरामक्रियारागः षड्जन्यासस्तु सग्रहः।**
**षड्जांशकस्तु संपूर्णो गेयो यामे तुरीयके॥**

**भावार्थः**—नादरामक्रिया राग संपूर्ण आहे. त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे व तो दिवसाचे चौथे प्रहरीं गावा.

**सन्यासा सग्रहा सांशा संपूर्णाऽपि कचित् कचित्।**
**आरोहे मनिवर्जाऽसौ कांभोजी सायमीरिता॥**

**भावार्थः**—कांभोजींत षड्ज ग्रह, अंश, न्यास, आहे. आरोहांत म, नि वर्जित आहेत. कोणी कोणी हा राग संपूर्ण मानितात. या रागाचा संध्याकाळ आहे.

षड्जांशा सग्रहा षड्जन्यासा सामवराळिका ।
संपूर्णा सर्वदा गेया सामवेदसमुद्भवा ॥

**भावार्थः**--सामवराळी रागांत षड्ज अंश, ग्रह, न्यास, आहे. तो संपूर्ण असून हवा तेव्हां गातात. या रागाची उत्पत्ति सामवेदापासून आहे.

रीतिगौळो निषादांशो निन्यासग्रह एवच ।
संपूर्णो गीयते सायं मुखारीमेलमाश्रितः ॥

**भावार्थः**—रीतिगौळ रागांत निषाद अंश, ग्रह, न्यास आहे. तो राग संपूर्ण आहे व मुखारी मेलांतून निघाला आहे. त्याचा वेळ सायंकाल आहे.

हिजूजीरागः संपूर्णो मन्यासो मग्रहांशकः ।
गेयोऽह्नः पश्चिमे यामे काकल्यंतरभूषितः ॥

**भावार्थः**—हिजूजी राग संपूर्ण असून त्यांत मध्यम ग्रह, अंश, न्यास आहे. या रागांत काकली व अंतर स्वर फार सुंदर दिसतात. तो दिवसाचे शेवटल्या प्रहरीं गातात.

गांशो नारायणीरागो गांधारन्यासकग्रहः ।
संपूर्णः प्रातरुद्गेयोऽवरोहे रिच्युतः क्वचित् ॥

**भावार्थः**—नारायणी राग संपूर्ण आहे व त्यांत गांधार ग्रह, अंश, न्यास, आहे. कोणी अवरोहांत ऋषभ वर्जित करितात. हा राग सकाळीं गावा.

पूर्णो वेलावलीरागो धन्यासस्तुधग्रहः ।
क्वचिद्रिपाभ्यां न्यूनः स्यादवरोहे प्रभातजः ॥

**भावार्थः**—वेलावली राग संपूर्ण आहे व त्यांत धैवत न्यास व ग्रह आहे. याचा वेळ सकाळचा आहे. कोणी कोणी अवरोहांत रि, प हे स्वर घेत नाहींत.

( हे आठ संपूर्ण राग " मध्यम " वर्गांतले झाले. )

रागः कन्नडबंगालो गांधारग्रहकांशकः ।
गन्यासारिषभन्यूनः प्रातर्गेयः स षाडवः ॥

**भावार्थः**—कंनडबंगाल राग षाडव आहे व त्यांत रिषभ वर्जित आहे. गांधार अंश, ग्रह, न्यास आहे. तो सकाळीं गावयाचा आहे.

पाडीरागस्तु सन्यासः सांशः षड्जग्रहः स्मृतः ।
तुरीययामे गेयोऽसौ निहीनः षाडवो मतः ॥

**भावार्थः**—पाडी राग षाडव आहे व त्यांत निषाद वर्जित आहे. ( इतर ग्रंथांत ग वर्जित ह्मटला आहे. ) षड्जस्वर अंश, ग्रह, न्यास आहे. दिवसाचे चवथे प्रहरीं तो गावा.

वसंतभैरवीरागः सन्यासः पंचमोज्झितः ।
सग्रहः षड्जकन्यासः प्रातर्गेयः स षाडवः ॥

**भावार्थः**—वसंतभैरवी रागांत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. पंचम वर्जित आहे. तो सकाळीं गातात.

सांशो गुंडक्रियारागः सग्रहन्यासषाडवः ।
धवार्जितः पूर्वयामे गेयो धैवतयुक् कचित् ॥

**भावार्थः**—गुंडक्रिया रागांत षड्ज ग्रह, न्यास आहे. धैवत वर्जित आहे. तो पहिल्या प्रहरीं गावा. कोणी धैवत वर्ज करीत नाहींत.

( हे मध्यम रागांपैकीं चार " षाडव " झाले. )

मध्यमादि मंग्रहांशो मन्यासो रिधवर्जितः ।
औडवः पश्चिमे यामे दिनस्य परिगीयते ॥

**भावार्थः**—मध्यमादि रागांत मध्यम ग्रह, अंश, न्यास, आहे. त्यांत रि, ध वर्ज असून तो ओडव आहे. दिवसाच्या शेवटल्या प्रहरीं गातात,

भूपालीरागः सन्यासः सांशः सग्रहएवच ।
मनिलोपादौडवः स्यात् प्रातः कालेच गीयते ॥

**भावार्थः**—भूपालींत षड्ज ग्रह, अंश, न्यास आहे. म, नि वर्जित आहेत. या रागाचा वेळ प्रातःकाल आहे

**रिग्रहो रेवगुप्तिः स्याद्रिन्यासो मनिवर्जितः ।**
**औडवश्चरमे यामे दिवसस्य च गीयते ॥**

**भावार्थः**—रेवगुप्तींत री स्वर ग्रह, न्यास आहे. म, नि वर्जित आहेत. हा राग दिवसाचे शेवटच्या प्रहरीं गातात. तो ओडव आहे.

( हे " मध्यम " रागांपैकीं तीन ओडव प्रकार सांगितले. )

**अथाधमानां रागाणां केषांचिल्लक्ष्म कथ्यते ।**
**सावेरीरागो धन्यासो धांशो धग्रह एवच ॥**
**औडवो गनिलोपेन प्रगे गेयो विचक्षणैः ॥**

**भावार्थः**—आतां कांहीं अधम रागांचीं लक्षणें सांगतों. " सावेरी " राग ओडव आहे. त्यांत ग, नी वर्ज करितात. धैवत अंश. ग्रह, न्यास आहे. तो पंडित सकाळीं गातात.

**धंटारवो धैवतांशो धग्रहन्यास एवच ।**
**गलोपात् षाडवः प्रोक्तः सर्वकाले प्रगीयते ॥**

**भावार्थः**—घंटारव रागांत धैवत अंश, ग्रह, न्यास, आहे. गांधार वर्जित असल्यामुळें तो राग षाडव आहे. तो सदां गावा.

**रागो नागध्वनिः पूर्णः षड्जांशः सग्रहोऽपिच ।**
**षड्जन्यासो गीयतेऽसौ सर्वदा गीतकोविदैः ।**

**भावार्थः**—नागध्वनि राग संपूर्ण आहे. त्यांत षड्ज अंश, ग्रह, न्यास, आहे. तो गायक लोक हवा तेव्हां गातात.

**सन्यासः सग्रहश्चैव सांशः संपूर्ण एवच ।**
**सोमरागः सदा गेयो मंद्रमध्यमभूषितः ॥**

**भावार्थः**—मंद्रमध्यमभूषित "सोमराग" संपूर्ण आहे, व त्यांत षड्ज ग्रह, अंश, न्यास, आहे. तो सदां गावा.

**पंचमांशग्रहन्यास आंदोलीराग ईरितः ।**
**निगलोपादौडवोऽयं सर्वकाले प्रगीयते ॥**

**भावार्थः**—आंदोली (आंधाली) रागांत ग, नि हे स्वर वर्ज आहेत व तो ओडव आहे. त्यांत पंचम ग्रह, अंश, न्यास, आहे. तो सदां गावा.

**शंकराभरणो रागः संपूर्णः सांशकः स्मृतः ।**
**षड्जन्यासग्रहः सोऽयं सामंतच्छायमाश्रितः ॥**

**भावार्थः**—शंकराभरण राग संपूर्ण आहे. त्यांत षड्ज ग्रह अंश न्यास आहे, व त्यांत सामंताची छाया दिसते.

**भिन्नषड्जाख्यरागोऽयं सग्रहः परिकीर्तितः ।**
**षड्जन्यासः षाडवोऽयं मलोपाद्गीयते सदा ॥**
**एवंप्रकारेणोन्नेया रागाः शेषा विचक्षणैः ।**
**अतिसंकीर्णभावेन नास्माभिर्लक्षिताः क्वचित् ॥**

**भावार्थः**—भिन्नषड्ज रागांत षड्ज स्वर ग्रह, न्यास आहे. या रागांत मध्यम वर्ज करून तो गातात. तो हवा तेव्हां गावा. या प्रमाणें बाकीचे राग समजून घ्यावे. ते फार संकीर्ण असल्यामुळें आह्मीं येथें सांगितले नाहींत.

असे हे अधम राग झाले.

**गानोपयोगिनां त्वेतत्प्रबंधानां तु लक्षणम् ।**
**रत्नाकरे शार्ङ्गदेवसूरिणा कथितं स्फुटम् ॥**
**गांधर्वमखिलंचापि तत्रैव स्पष्टमीरितम् ।**
**तत एवावगंतव्यं तस्मान्नकथितं मया ॥**

**भावार्थः**--गानोपयोगी प्रबंधांचें लक्षण रत्नाकरांत शार्ङ्गदेव पंडितानें स्पष्ट दिलें आहे. गांधर्व गीतप्रपंचही त्यानें सविस्तर सांगितला आहे. हे विषय तेथून वाचकांस घेतां येतील, ह्मणून मीं दिले नाहींत.

**शाकेनेत्रधराधराब्धिधरणीगण्येथसाधारणे ।**
**वर्षे श्रावणमासि निर्मलतरे पक्षे दशम्यां तिथौ ॥**
**रामाभात्यविनिर्मिते स्वरतते संगीतरत्नाकरात् ।**
**सोऽयं मेलकलानिधिर्मतिमतामाकल्पमाकल्पताम् ॥**

[ टीप. या ग्रंथाची तारीख "श्रावण शुद्ध दशमी, शके १४७२ साधारण संवत्सर," वरील श्लोकावरून ठरेल. ]

इतिश्रीमदभिनवभारताचार्यवाग्गेयकारतोडरमल्लतिम्मामात्य-
नंदनरामामात्यनिर्मिते स्वरमेलकलानिधौ
रागप्रकरणं पंचमम्
श्रीरस्तु

## रामामात्य पंडिताचे वीस मेल व त्यांचे स्वर.

| मेलनांव | स्वर. |
|---|---|
| १ मुखारी | यांत सर्व स्वर शुद्ध ( दक्षिणेकडे या मेलाला कनकांगी ह्मणतात. ) |
| २ मालवगौड | सा रि म प ध शुद्ध, च्युतमध्यमगांधार, च्युतषड्जनिषाद. ( हिंदुस्थानी भैरव थाट ) |
| ३ श्रीराग | सा, पंचश्रुति रि ध, म प शुद्ध, साधारण ग, कैशिक नि. ( हिंदुस्थानी काफी थाट ) |
| ४ सारंगनाट | सा म प शुद्ध, रि ध पंचश्रुतिक, च्युतमध्यमगांधार च्युतषड्जानिषाद. ( हिंदुस्थानी बिलावल थाट ) |
| ५ हिंदोल | सर्व स्वर श्री मेलाचे, परंतु धैवत शुद्ध, ( ह्मणजे हिंदुस्थानी कोमलध ) ( आसावरी थाट ) |
| ६ शुद्धरामक्रिया | स रि प ध शुद्ध, च्युतमध्यमगांधार, च्युतपंचममध्यम, च्युतषड्जानिषाद. ( हिंदुस्थानी पूर्वी थाट ) |
| ७ देशाक्षी | स म प शुद्ध, षट्श्रुति रि, पंचश्रुति ध, च्युतमध्यमगांधार, च्युतषड्जानिषाद. |
| ८ कंनडगौळ | देशाक्षीचेच बहुतेक स्वर, फक्त कैशिक निषाद. |
| ९ शुद्धनाट | स म प शुद्ध, षट्श्रुति रि ध, च्युतमध्यमगांधार, च्युतषड्जनिषाद. |
| १० आहरी | स म प ध शुद्ध, पंचश्रुति रि, साधारण ग, च्युतषड्जनिषाद. |
| ११ नादरामक्री | स रि म प ध शुद्ध, साधारणगांधार, च्युतषड्जनिषाद. |
| १२ शुद्धवराळी | स रि ग प ध शुद्ध, च्युतषड्जनिषाद, च्युतपंचममध्यम. |

48



| मेलनांव | स्वर. |
| --- | --- |
| १३ रीतिगौळ | स रि ग म प शुद्ध, पंचश्रुति ध, कैशिक निषाद. |
| १४ वसंतभैरवी | स रि म प ध शुद्ध, च्युतमध्यमगांधार, कैशिक निषाद. |
| १५ केदारगौळ | स म प शुद्ध, पंचश्रुति रि ध, च्युतमध्यमगांधार, च्युतषड्जनिषाद. ( कैशिक नी असावा ) |
| १६ हिजूजी | स रि म प ध शुद्ध, अंतरगांधार, काकली निषाद. |
| १७ सामवराळी | स रि ग म प ध शुद्ध, काकली निषाद. |
| १८ रेवगुप्ति | स रि म प ध नि शुद्ध, अंतरगांधार. |
| १९ सामंत | स म प शुद्ध, रि ध षट्श्रुतिक, अंतरगांधार, काकली निषाद. |
| २० कांभोजी | स म प शुद्ध, अंतरगांधार, काकली निषाद रि ध पंचश्रुतिक. |

## कलानिधींतले मेल व त्यांचे जन्यराग ( लक्ष्यसंगीतांतून ).

| मेल | जन्यराग |
|---|---|
| १ मुखारी | १ मुखारी |
| २ मालवगौड | १ मालवगौड २ ललिता ३ बौळी ४ सौराष्ट्र ५ गुर्जरी ६ मेघबौळी ७ फलमंजरी ८ गुंडक्री ९ सिंधुरामक्री १० छायागौळ ११ कुरंजी १२ कंनडबंगाल १३ मंगलकैशिक १४ मलहरी · |
| ३ श्रीराग | १ श्रीराग २ भैरवी ३ गौळी ४ धन्यासी ५ शुद्धभैरवी ६ वेलावली ७ मालवश्री ८ शंकराभरण. ९ आंधाली १० देवगांधार ११ मध्यमादि |
| ४ सारंगनाट | १ सारंगनाट २ सावेरी ३ सालगभैरवी ४ नटनारायणी ५ शुद्धवसंत ६ पूर्वगौड ७ कुंतलवराळी ८ भिन्नषड्ज ९ नारायणी |
| ५ हिंदोल | १ हिंदोल, २ मार्गहिंदोल, ३ भूपाल |
| ६ शुद्धरामक्रिया | १ शुद्धरामक्रिया, २ बौळी, ३ आर्द्रदेशी ४ दीपक |
| ७ देशाक्षी | १ देशाक्षी |
| ८ कंनडगौळ | १ कंनडगौळ, २ घंटारव, ३ शुद्धबंगाल, ४ छायानाट, ५ तुरुष्क तोडी, ६ नागध्वनि, ७ देवक्रिया |
| ९ शुद्धनाट | १ शुद्धनाट |
| १० अहीरी | १ आहीरी |
| ११ नादरामक्रिया | १ नादरामक्रिया |
| १२ शुद्धवराळी | १ शुद्धवराळी |
| १३ गौळ | १ रीतिगौळ |
| १४ वसंतभैरवी | १ वसंतभैरवी, २ सोम |
| १५ केदारगौळ | १ केदारगौड २ नारायणगौड |

| १६ हेजूजी | १ हेजूजी |
|---|---|
| १७ सामवराळी | १ सामवराळी |
| १८ रेवगुप्ति | १ रेवगुप्ति |
| १९ सामंत | १ सामंत |
| २० कांभोजी | १ कांभोजी |

